# दीराची बायडी हीच माझी तायडी,

## अर्थात जनजागृती नाटक



लेखक: जयदीप चिपलकट्टी

(jaydeep.chipalkatti@gmail.com)

२७ डिसेंबर, २०२३



आकाशी रंगाच्या रेशमी सदऱ्यावर तांबडाभडक नेकटाय, पांढराशुभ्र लॅबॉरेटरी कोट, खाली करवतकाठी धोतर आणि अनवाणी पाय अशा वेशात असलेली एक उंच, शेलाटी आणि देखणी तरुणी रंगमंचावर येते.

**तरुणी:** (प्रेक्षकांना उद्देशून) नमस्कार! मी एक मानसशास्त्रज्ञ आहे. आपण स्त्रीपुरुषसमतेच्या युगात राहतो. आणि नसलोच राहात तर निदान असं युग लवकर येवो अशी तोंडदेखली का होईना पण अपेक्षा व्यक्त करतो. त्यामुळे 'ज्ञा' म्हणत नाही; 'ज्ञ'च म्हणते. तर मी एक मानसशास्त्रज्ञ आहे. परंतु मानसशास्त्रज्ञ ह्या जमातीचा विवक्षित असा पोशाख नसतो. आमच्यांतले काहीजण साड्या नेसतात तर काहीजण शर्टपॅंट घालतात. काहीजण टापटीप राहतात तर काहीजण गबाळे राहतात. ह्यामुळे पंचाईत अशी होते की आमची काही निश्चित प्रतिमा लोकांच्या मनात ठसत नाही, आणि पडायला हवं तसं समाजात आमचं वजन पडत नाही. यावर उपाय म्हणून प्रयोगशाळेत काम करणाऱ्या जीवशास्त्रज्ञाचा पोषाख मी ढापायचं ठरवलं आहे. हा फिकट निळा सदरा, त्यावरचा हा लालचुटुक नेकटाय आणि हा लॅबॉरेटरी कोट माझ्या अंगावर तुम्हाला दिसतो आहे तो त्याचमुळे. आणि तसं पाहिलं तर जीवशास्त्र आणि मानसशास्त्र ही एक आहेत की दोन आहेत याबद्दल अनिश्चिती आहेच. ती जर एकच निघाली तर प्रश्न मिटला.

अर्थात जीवशास्त्रज्ञाचा पोषाख जर पूर्णच ढापायचा तर कमरेखाली काळी पॅंट आणि चकचकीत काळे कातडी बूट असायला हवे होते. पण इथे मेख अशी की आजच्या नाटकाची मी सूत्रधारिणी सुद्धा आहे. भरतमुनींनी नाट्यशास्त्र लिहिलं ते स्त्रीपुरुषसमतेचं युग मुळीच नव्हतं, आणि तसं युग लवकर येणार नाही याची त्यांना अनुच्चारित का होईना पण खात्री होती. त्यामुळे 'धार' म्हणत नाही; 'धारिणी'च म्हणते. आता सूत्रधाराचा असा पारंपरिक पोषाख असतो आणि सूत्रधार कसा दिसायला हवा याची एक निश्चित प्रतिमाही लोकांच्या मनात असते. म्हणूनच माझा कमरेखालचा

पोशाख मी परंपरेकडून ढापलेला आहे. सारांश काय तर कमरेच्या वरचा पेहराव जीवशास्त्रज्ञाचा आहे, तर कमरेखालचा सूत्रधाराचा आहे. आता याच्या उलट करायचं तर खाली बूटपाटलोण घालावी लागली असती, आणि वरचं शरीर उघडंबंब ठेवून तिथे फक्त एक जानवं आणि त्यावर झिरझिरीत उपरणं असा थाट करावा लागला असता. अनेक कारणांनी तुम्हाला ते बघवलं नसतं, तेव्हा मी म्हणते की जे आहे तेच ठीक आहे.

(किरमिजी रंगाचे बूट, स्टार्च केलेल्या पांढऱ्या शर्टावर थ्री पीस सूट, दाढी, उजव्या हातात पाईप आणि डाव्या हातात क्लिपबोर्ड अशा वेषातला एक पोरगेलासा नट येऊन पोक काढून घुमेपणाने उभा राहतो.)

**सूत्रधारिणी:** पारंपरिक नाटकात सूत्रधारानंतर नटी येते, तसा आजच्या नाटकामध्ये सूत्रधारिणीनंतर आलेला हा नट. हा देखील मानसशास्त्रज्ञ आहे, पण शिकाऊ. गेली कित्येक वर्षं माझ्या हाताखाली डॉक्टरेट करतो आहे. (नट अनिश्चितपणे हात उडवतो.) याचं संशोधन अंमळ रुटूखुटू चाललेलं असून प्रबंध रखडलेला आहे. ह्या साऱ्या संदिग्ध प्रगतीचा वचपा हा माणूस पोषाखाने भरून काढतो. अर्थात पोषाख कुणाकडून ढापलेला आहे हे तुमच्या लक्षात आलं असेलच. (नट खांदे उडवतो.)

**सूत्रधारिणी:** आता मी किनई पारंपरिक सुरुवात करते. हे नटा, निसर्गाच्या अविरत आणि अव्याहत फिरणाऱ्या चक्राप्रमाणे सद्यकाळी कुठला ऋतू आहे हे तुझ्या म्लान आणि क्लांत अशा मुद्रेवरून लगेचच ओळखू येतं आहे. तरी पण सांगूनच टाक बरं कुठला ऋतू?!

**नट:** (तोंडातल्या तोंडात) ग्रीष्म.

**सूत्रधारिणी:** वत्सा, असा शक्तिपात झाल्यासारखा वागू नकोस. आत्मविश्वासाचा आव आणून बोल. निसर्गामध्ये भक्षक प्राण्यांना भक्ष्याचा दुबळेपणा फार पटकन ओळखू येतो. तसं तुझं होऊ देऊ नकोस. पुन्हा सांग बरं कुठला ऋतू?!

(यापुढच्या प्रसंगात नट जास्त जास्त आत्मविश्वासाने बोलू लागतो.)

**नट:** ग्रीष्माचा उत्तरार्ध!

**सूत्रधारिणी:** बरोब्बर! ग्रीष्माच्या उत्तरार्धात काय असतं?

**नट:** मनोविकार आवेर्य मास असतो.

**सूत्रधारिणी:** बरोब्बर! म्हणजे काय ते फोड करून सांग बघू.

**नट:** मनोविकार आणि मानसिक आरोग्य याबद्दल समाजामध्ये आवेर्य निर्माण व्हावं म्हणून आपण निरनिराळे कार्यक्रम करतो. यात उदाहरणार्थ व्याख्यानं, परिसंवाद आणि करमणुकीचे कार्यक्रम असतात. अर्थात अलिकडच्या पिढीला कळावा म्हणून 'आवेर्य' हा धेडिंग्रजी शब्द मुद्दाम वापरलेला आहे. जुना शब्द 'जनजागृती' असा आहे.

**सूत्रधारिणी:** अगदी बरोब्बर! आणि म्हणूनच कुठलातरी एक विशिष्ट मनोविकार निवडून त्याबद्दल समाजामध्ये आवेर्य निर्माण व्हावं यासाठी आपण आज एक नाटक करणार आहोत. तर आता प्रश्न असा की आपण कुठला मनोविकार निवडणार आहोत?

**नटः** यादी बघून सांगावं लागेल. (क्लिपबोर्डकडे बघत एकेक कलम वाचून खुणा करत जातो.) डिप्रेशन पार झिजून गुळगुळीत झालेलं आहे. 'डिप्रेशनबद्दल अवेअरनेस' हा शब्दप्रयोग नुसता ऐकला तरी लोक मरगळतात. अल्झायमर्स तर किती वर्षांत किती वेळा झाला आहे हे कुणाला आठवतदेखील नाही. स्किझोफ्रेनिया होऊन गेलेला आहे —

**सूत्रधारिणीः** मग शिल्लक काय आहे?

**नटः** सायकोपॅथी झालेली नाही —

**सूत्रधारिणीः** नको! सायकोपॅथांबद्दल सहानुभूती निर्माण करणं हे अवघड काम आहे. त्यासाठी फार ताकदवान नाटककार जन्मावा लागेल. आपली तेवढी प्राज्ञा नाही. दुसरं काहीतरी बघूया —

**नटः** (कपाळाला आठ्या घालून डोळे बारीक करून क्लिपबोर्डकडे बघत) प्रॉसोपॅ — (सूत्रधारिणी त्याच्याकडे शंकित चेहऱ्याने बघत राहते.) प्रोसोपॅगो —

**सूत्रधारिणीः** (जोरजोरात मान हलवते) प्रोसोपॅग्नोसिया! नीट म्हण! प्रो-सो-पॅग्नो-सिया.

**नटः** प्रो-सो-पॅग्नो-सिया. पण म्हणजे काय?!

**सूत्रधारिणीः** ग्रीकमध्ये प्रोसोपॉन म्हणजे चेहरा. अग्नोसिया म्हणजे काय सांग बघू?! इंडो-युरोपियन शब्द आहे. एवढं तुला यायला पाहिजे.

**नटः** (अडखळता विचार करत, वेळ घेत) अग्नोसिया — अ ग्नोसिया — ग्नोसिया — ग्नोसिस —

ग्नोसिस? (सूत्रधारिणी उत्साहवर्धक हातवारे करते आणि स्वत:च्या डोक्यावर बोटाने टकटक करते.) ग्नोसिस!— ग्यान! — ज्ञान! — अ ज्ञान — अज्ञान! अग्नोसिया म्हणजे अज्ञान!

**सूत्रधारिणी:** बरोब्बर! तर प्रोसोपॅग्नोसिया म्हणजे चेहऱ्यांबद्दल अज्ञान, किंवा चेहरे ओळखू न येणं. प्रोसोपॅग्नोसिया असलेल्याला चेहरे ओळखू येत नाहीत. नवे चेहरे नीट लक्षात राहात नाहीत.

**नट:** पण बाकी सगळं व्यवस्थित दिसतं?

**सूत्रधारिणी:** हो. त्यांचे डोळे पूर्णपणे शाबूत असतात. समोर झाड असेल झाड दिसतं. म्हैस असेल तर म्हैस दिसते. बाकी सगळं व्यवस्थित दिसतं. पण चेहरे ओळखू येत नाहीत.

**नट:** हं! तर आता प्रोसोपॅग्नोसिया ह्या विकाराबद्दल आपल्याला समाजामध्ये आवेर्य निर्माण करायचं आहे.

**सूत्रधारिणी:** हो! आणि त्यासाठी आपल्याला आज एक नाटक करायचं आहे.

**नट:** मग नेहमीच्याच तालात करायचंय का? दरीशिखरदरीशिखर?

**सूत्रधारिणी:** (गोंधळात पडून) दरीशिखरदरीशिखर?

**नट:** (उत्साहात येऊन) कळलं नाही ना?! समजावून सांगतो. ‘दरीशिखरदरीशिखर’ हा गोष्ट सांगण्याचा एक आकृतिबंध आहे —

**सूत्रधारिणी:** (कंटाळल्याचा आविर्भाव करत) ए—, माझे पाय दुखायला लागलेत. आपण बसून घेऊया का?

**नट:** (त्रासिक चेहऱ्याने) खरं तर भरतमुनींनी तशी परवानगी दिलेली नाही —

**सूत्रधारिणी:** तेवढं चालतं रे! मी तुझी पीएचडी गाईड आहे ना? मग ऐक माझं! (विंगेत बघून टाळ्या वाजवते.) कोण आहे रे तिकडे? (मावळ्यांसारखा पोषाख केलेले दोघेजण विंगेतून एक आलिशान शेज लाँग आणि एक कातडी आरामखुर्ची घेऊन येतात. स्टेजवर ह्या वस्तू मांडून कुर्निसात करून परत जातात. शेज लाँगच्या पृष्ठभागावर उत्तम दर्जाचं चिटाचं कापड ताणून बसवलेलं आहे. आरामखुर्ची तिच्या पायाशी ठेवलेली आहे. सूत्रधारिणी खुर्चीकडे बोट करते.) तुझ्या सोंगाचा मान ठेवून तू नोटपॅड घेऊन आरामखुर्चीत बैस. मी तुझ्यासमोर न्यूरॉटिक मनोरुग्णिणीसारखी शेजेवर लोळत पडते. (तो खुर्चीत बसतो तशी ती शेज लाँगवर ऐसपैस पसरते.) आता बोल. 'दरीशिखरदरीशिखर' हा गोष्ट सांगण्याचा एक आकृतिबंध आहे —

**नट:** हो. आकृतिबंध आहे. उदाहरणार्थ, सिंडरेलाची गोष्ट घे. बिचारी सिंडरेला पहिल्या दोन पानांत ढोरमेहनत करत शेगडीतले कोळसे उपसत बहिणींचे टोमणे खात मुळूमुळू रडत असते. म्हणजे ती दरीत आहे. इथे तिला एक परी भेटते, चमकढमक कपडे चढवते आणि भोपळ्याच्या गाडीत घालून राजवाड्यात पाठवते. तिथला राजपुत्र तिच्या प्रेमात पडतो. ती आता शिखरावर आहे. पण याच वेळी घड्याळात बाराचे टोले पडतात. सगळं गमावून बसून काचेचा एक बूट मागे ठेवून तिला लपूनछपून घरी परत यावं लागतं. म्हणजे ती पुन्हा दरीत पडली. पण शेवटी तो बूट घेऊन राजपुत्र तिच्या घरी येतो, तिला तो फिट्ट बसतो आणि बहिणींच्या नाकावर टिच्चून तिचं राजपुत्राशी लग्न लागतं. म्हणते ती पुन्हा शिखरावर गेली. (हवेत बोटांनी दाते काढून दाखवत) असा हा आकृतिबंध असतो: दरीशिखरदरीशिखर.

**सूत्रधारिणी:** हं!

**नट:** तर मुद्दा असा की हा आकृतिबंध वापरण्याचा मोह लोकांना सतत होतो. उदाहरणार्थ, आपल्याला समज डिप्रेशनबद्दल आवेर्य निर्माण करायचं आहे. तर नेहा नावाची एक मुलगी घ्यायची आणि डिप्रेशनमध्ये पाडायची. आता ती दरीत आहे. पण मग कुणीतरी तिच्याशी समजुतीने बोलतं आणि तिला एका (खुणेने दाखवत) लॅबकोटवालीकडे घेऊन जातं. लॅबकोटवाली तिला सांगते की डिप्रेशन हा आळशीपणा किंवा चारित्र्यदोष नव्हे. मेंदूतल्या रसायनांचं संतुलन बिघडल्यामुळे ते येतं. वास्तविक मेंदूत असा कुठे तराजू वगैरे नसतो, पण संतुलन हा शब्द ह्या संदर्भात वापरण्याचा प्रघात आहे. लॅबकोटवाली तिला गोळ्याबिळ्या देते. ह्या गोळ्या घेऊन नेहाला बरं वाटायला लागतं. म्हणजे ती दरीतून शिखरावर आली. पण एका क्षणी तिची प्रगती खुंटते. डिप्रेशन कमी झालं तरी आयुष्यातले इतर प्रश्न तसेच उरलेले असतात. ह्या सगळ्याला कंटाळून नेहाचा बॉयफ्रेंड तिला सोडून दुसऱ्या मुलीबरोबर निघून जातो. त्यामुळे नेहा पुन्हा एकदा डिप्रेशनमध्ये जाते, म्हणजेच पुन्हा एकदा दरीत घसरते. पण शेवटी मी एक स्वतंत्र व्यक्तिमत्वाची स्त्री आहे आणि कुठल्याही पुरुषाच्या आधाराची मला गरज नाही हे नेहाला उमगतं. उभारी धरून ती पुन्हा शिखरावर येते. इथे कुठेतरी सूर्याचे कोवळे किरण नेहाच्या चेहऱ्यावर चमकू लागतात आणि तिच्या मुक्त केसांतून वारा खेळू लागून गोष्ट संपते. (हवेत बोटांनी दाते काढून दाखवत) असा तो आकृतिबंध असतो: दरीशिखरदरीशिखर. कलाविश्वात हा सगळीकडे काँग्रेस गवतासारखा पसरलेला आहे.

**सूत्रधारिणी:** ह्या विषयात तू बराच खोलवर शिरलेला दिसतो आहेस. प्रबंध का रखडला असावा हे आता कळलं.

**नट:** हेही एक प्रकारचं मानसशास्त्र आहे. कलेचं मानसशास्त्र.

**सूत्रधारिणी:** मान्य आहे. पण मला वाटतं आपण वेगळं काहीतरी करूया. दरीशिखरदरीशिखर नको.

**नट:** ठीक आहे; काय वेगळं करूया?

**सूत्रधारिणी:** मी काही सुचतं का बघते. तूही विचार कर.

**नट:** हो. (दोन क्षण तसेच जातात. नट मोठ्ठाल्या काळ्या फाउंटनपेनने कातडी बांधणीच्या वहीत काहीतरी लिहितो आहे. ते मनासारखं न झाल्यामुळे कागद फाडतो.)

**सूत्रधारिणी:** नाटकीपणा करून बोळे इकडेतिकडे फेकू नकोस. (नट असहायपणे मान हलवतो, आणि फाडलेल्या कागदाचा बोळा जॅकेटच्या खिशात टाकून पुन्हा लिहू लागतो. आणखी दोन क्षण जातात.)

**नट:** मी काय म्हणतो, आपण एक फार्स केला तर?

**सूत्रधारिणी:** फार्स?! पण आपल्या दोघांचाही स्वभाव विनोदी नाही.

**नट:** मान्य आहे. पण म्हणूनच बघूया जमतो का ते. मला एक कल्पना सुचते आहे —

**सूत्रधारिणी:** बोल.

**नट:** प्लाउटस नावाचा रोमन नाटककार होता. दोन जुळे भाऊ एकाच गावात येतात आणि त्यामुळे

आजूबाजूच्यांचा गोंधळ होतो असा विषय घेऊन त्याने एक फार्स लिहिला. त्याचं नाव 'मेनाएख्मी', म्हणजेच मेनाएख्मस बंधू. लोकांना तो फार आवडला. अठराशे वर्षांनंतर ह्या विषयावर शेक्सपिअरने डल्ला मारला. 'अधिकस्य अधिकम् फलम्' म्हणत त्याने जुळयांच्या दोन जोड्या आणल्या आणि 'कॉमेडी ऑफ एरर्स' नावाचा फार्स लिहिला. तोही खूप चालला. त्याचीच उसनवारी करून गुलझारने 'अंगूर' नावाचा सिनेमा काढला. पण मराठीत अशासारखं काही आहे का हे मला ठाऊक नाही. तसा एक प्रयत्न करून बघूया? (वहीत आकृत्या काढून नोंदी करू लागतो.)

**सूत्रधारिणी:** (सुस्कारा सोडत) माझ्या अंतरीची व्यथा तुला सांगते. कुठलाही फार्स बघताना मनातला शास्त्रकाटा मला फार टोचत राहतो. शंकाकुशंका येत राहतात. उदाहरणार्थ, 'अंगूर' मी बघितलेला आहे. त्यात सुरुवातीला उत्पल दत्त आणि त्याची बायको शम्मी ह्या दोघांना जुळे मुलगे असतात —

**नट:** हो. नंतर मोठेपणी ते दोघे संजीवकुमार होतात.

**सूत्रधारिणी:** बरोब्बर. संजीवकुमार होतात. इतपत ठीक आहे, कारण जुळे मुलगे अनेकांना असतात. तर आता उत्पल दत्त, शम्मी आणि हे दोघे भावी संजीवकुमार जहाजातून कुठेतरी जायला निघणार असतात, पण नेमका तोच मुहूर्त साधून आणखी दोन जुळे मुलगे कुणीतरी त्यांच्या दारात सांभाळायला आणून टाकतं. असं काही होईल ही शक्यता मला अगदीच त्र्यांयशी लाखांत एक वाटते.

**नट:** हे पुरतं पटलं नाही, पण असो. नंतर मोठेपणी ते दोघे देवेन वर्मा होतात.

**सूत्रधारिणी:** बरोब्बर. देवेनवर्मा होतात. तर हे असे बे दुणे दुक्कलजुळे जहाजातून चाललेले असताना जहाज फुटतं. एक भावी सं-कु आणि एक भावी दे-व एकीकडे राहतात, तर दुसरा भावी सं-कु आणि दुसरा भावी दे-व दुसरीकडे जातात. आता पांगापांग व्हायची तर ती कशीही होऊ शकली असती. दोन्ही सं-कु एकीकडे आणि दोन्ही दे-व दुसरीकडे अशी होऊ शकली असती. किंवा दोन्ही दे-वंसकट एक सं-कु एकीकडे, आणि शिल्लक सं-कु दुसरीकडे अशी होऊ शकली असती. किंवा कुणीतरी एक दे-व बुडून मरू शकला असता. पण नाही. सगळे जगतात, इतकंच नव्हे तर संकुदेव-१ एकीकडे आणि संकुदेव-२ दुसरीकडे अशीच विभागणी होते. म्हणजे मुळात फार कमी असलेली शक्यता आणखीनच कमी झाली. आता यापुढे संकुदेव-१ एका गावी मोठे होतात तर संकुदेव-२ दुसऱ्या गावी मोठे होतात. दोन्ही ठिकाणचं हवापाणी वेगळं असणार, शाळा वेगळ्या असणार, मित्र वेगळे असणार, शेजारी वेगळे असणार. पण असं असूनही दोन्ही सं-कुंची बोलण्याची धाटणी तंतोतंत एकमेकांसारखी असते, आणि दोन्ही दे-वंची तंतोतंत एकमेकांसारखी असते. इतकंच नव्हे तर एकाही सं-कुकडे पांढरा कुर्ता आणि धोतर याखेरीज कपडे नसतात, आणि एकाही दे-वकडे राखाडी कुर्ता आणि धोतर याखेरीज कपडे नसतात. इतकं सगळं जुळून येण्याची शक्यता निखर्वात एक सुद्धा नसेल. ही अशी शिळेवर पेललेल्या शिळेवर पेललेली शिळा उचलून धरायची इतकं सस्पेन्शन ऑफ डिसबिलीफ मला जमत नाही. हात दुखून येतात. (क्लान्तपणे मान टाकून डोळे मिटून घेते.)

**नट:** हं. पण इतकं सगळं जुळून येण्याची शक्यता निखर्वात एक किंवा महापद्मात एक नाही. ती एकात एक आहे.

**सूत्रधारिणी:** कशी काय?!

**नट:** तुझ्या डाव्या हाताखाली बघ. (सूत्रधारिणी शेज लाँगवर विसावलेला डावा हात उचलते.)

हरणाची मान सिंहाने जबड्यात धरलेली आहे, पण याचा त्रास करून न घेता ते हरीण झाडाच्या बुंध्याजवळचं गवत खातं आहे. आणि खाली इतकी हिंसा होत असतानाही न डगमगता त्याच झाडावर चढलेला मोर डाळिंबाचा दाणा टिपतो आहे. निसर्गात हे सगळं असंच घडण्याची शक्यता किती आहे?

**सूत्रधारिणी:** पण हे चिटाच्या कापडावरचं हैदराबादी डिझाईन आहे.

**नट:** नाटक हेही डिझाईन असतं. डाळिंब, मोर, गवत, हरीण आणि सिंह विशिष्ट परिस्थितीत एकत्र आणायचे असं कलाकाराने ठरवल्यावर ते तसे येण्याची शक्यता एकात एक असते. दोन सं-कु, त्यांचे दोन पांढरे कुर्ते, दोन दे-व आणि त्यांचे दोन राखाडी कुर्ते हे विशिष्ट रचनेत एकत्र आणायचे असं गुलझारने ठरवल्यावर ते तसे येण्याची शक्यताही एकात एक असते.

**सूत्रधारिणी:** पण वास्तवाशी ह्या सगळ्याचा संबंध असायला हवा ना?

**नट:** हो ना. जर जुळे मुलगे वास्तवात अस्तित्वात नसते तर फक्त नाटक करण्यासाठी म्हणून ही कल्पना कुणी नव्याने शोधून काढली असती असं मला वाटत नाही. किमान तितपत संबंध असायलाच हवा. पण तिथून पुढे तो नक्की काय असायला हवा हे स्पष्ट नाही. तरीही मला काय वाटतं ते सांगतो. नाटक हा काही प्रमाणात वास्तवाचा आव असतो आणि काही प्रमाणात ते डिझाईन असतं. तो फार्स आहे की इब्सेन आहे याला महत्त्व नाही. दोन्हींत वास्तवाचाव असतो आणि दोन्हींत डिझाईन असतं.

**सूत्रधारिणी:** (काही क्षण विचार करून) तुझं बरोबर वाटतं. म्हणजे फार्समधले प्रसंग वास्तवात घडण्याची संख्याशास्त्रीय शक्यता किती हा प्रश्न चुकीचा आहे. तसा काही आकडा काढता येणार

नाही, आणि काढून उपयोगही नाही.

**नट:** हो. पण यातली गंमत अशी की प्रसंग अशक्यही वाटता कामा नयेत. आपण म्हणालो की संकुदेव-१ आधीपासून एका गावी राहात असतात. त्या गावाला बरेली म्हणू. एके दिवशी संकुदेव-२ आयुष्यात पहिल्यांदा बरेलीला येतात. पण आल्या आल्या बरेलीतला रेल्वेचा तिकिट कलेक्टर त्यांना ओळखतो, मग पहिल्या सं-कुची मेव्हणी ओळखते, मग पोलीस इन्स्पेक्टर ओळखतो, वगैरे वगैरे. इतके अनोळखी लोक आपल्याला का ओळखताहेत याचं काहीतरी स्पष्टीकरण दुसऱ्या सं-कुला उपलब्ध व्हायला हवं. नाहीतर कथानक कोसळेल. ते स्पष्टीकरण असं की दुसऱ्या सं-कुला डिटेक्टिव्ह कादंबऱ्यांचा भयंकर षौक असतो आणि खूनखराबा, कटकारस्थानं यांत त्याचा मेंदू भिजून गेलेला असतो. त्यामुळे त्याला वाटतं की बरेलीतले हे सगळे अनोळखी लोक एका पाताळयंत्री गँगमध्ये सामील आहेत. आपल्याला घोळात घेऊन लुटण्याचं त्यांचं कारस्थान आहे, आणि म्हणून ते खोटी ओळख दाखवताहेत. दुसरा सं-कु हा जरी डिझाईनचा भाग असला तरीदेखील वास्तवातल्या सर्वसामान्य माणसापेक्षा त्याची मानसिकता फार वेगळी ठेवून चालत नाही. अनोळखी माणसं ओळखायला लागली तर कुणीही बावचळेलच. यावर उतारा म्हणून एखाद्या माणसाची जशी अतिरिक्त कफप्रकृती असते तशी गुलझारने दुसऱ्या सं-कुला अतिरिक्त संशयी प्रकृती दिलेली आहे. तोही डिझाईनचाच भाग आहे. चित्रातलं डाळिंबाचं झाड जास्त कमानदार करायचं असेल तर मोराची मानही जास्त लवचीक करावी लागते.

**सूत्रधारिणी:** (काही क्षण विचार करून) हेही बरोबर वाटतं.

**नट:** शिष्यादिच्छेत पराजयम् —

**सूत्रधारिणी:** (पराभूत हास्य करत) पण मग मला यात एक डिझाईन फ्लॉ दिसतो. जहाज

फुटल्यानंतर संकुदेव-२ बरोबर शम्मीसुद्धा जिवंत उरते, आणि पुढे ती त्यांच्याच घरी राहते. पण असं जर असेल तर 'बाबांनो, तुम्हाला प्रत्येकी एक जुळा भाऊ आहे' हे तिने संकुदेव-२ ना केव्हातरी सांगितलंच असणार. आणि असं जर असेल तर बरेलीमधले इतकेजण आपल्याला ओळखताना बघून आपले जुळे भाऊ कदाचित इथे राहात असतील असा संशय त्यांना का येत नाही?

**नट:** अगदी मान्य आहे. 'मेनाएख्मी' मध्ये जवळपास हेच होतं. त्यात एक जुळा भाऊ सिरॅक्यूजला आणि दुसरा एपिडॅम्नसला असतो. सिरॅक्यूजवाला आपल्या भावाला शोधत जगभर हिंडत असतो. शेवटी एकदाचा तो एपिडॅम्नसला येतो आणि तिथले अनोळखी लोक अर्थात त्याला ओळखायला लागतात. पण आपला शोध संपलेला आहे इतकी साधी गोष्ट त्याच्या लक्षात येत नाही. नाटकातलं पात्र संशयी आहे हे स्वीकारायला प्रेक्षक तयार होतील, पण कथानकातला जो कळीचा मुद्दा आहे त्याचबाबतीत ते विसराळू असेल हे स्वीकारायला तयार होणार नाहीत. नेमका हाच दोष 'कॉमेडी ऑफ एरर्स' मध्येदेखील तसाच्या तसा आहे. का कोण जाणे, फार प्राचीन काळापासून तो अश्वत्थाम्यासारखा चिरंजीव राहिलेला आहे. न बोलावता थेटरात हजर होतो.

**सूत्रधारिणी:** लोक म्हणतात फार्स डोकं बाजूला ठेवून बघायचा असतो. पण तसं नाही. याउलट डोक्याला नेहमीपेक्षा जास्त काम असतं. फीचरला बग समजून चालत नाही आणि बगला फीचर समजून चालत नाही.

**नट:** हो ना. आणि एखाद्याला जो बग वाटेल तो दुसऱ्याला गोजिरवाणा लेडीबग वाटू शकतो. समजा कुणी म्हणालं की संकुदेव-२ ना वाईट वाटू नये म्हणून शम्मी जुळ्या भावांबद्दल त्यांना काही बोलली नसेल, तर यावर आता काय वाद घालणार?

**सूत्रधारिणी:** तेही खरं आहे. आणि अशी काहीतरी सबब शोधून काढायला कारणही आहे.

‘अंगूर’च्या शेवटी पहिला सं-कु जेव्हा दुसऱ्या सं-कुच्या घरी जातो तेव्हा तो स्वत:च्या आईला ओळखत नाही. चुकून मोलकरणीच्या पाया पडतो. तो प्रसंग फार विनोदी आहे. शम्मीला अडचण समजून सुरुवातीलाच बुडवून टाकली असती तर हा विनोदही तिच्यापाठोपाठ अर्घ्य म्हणून गेला असता.

**नट:** प्रेक्षकांना आपल्या बाजूला वळवून घेणं महत्त्वाचं. तेवढं एकदा झालं की सोयीची स्पष्टीकरणं तेच शोधून काढतात. (खुर्चीत मागे रेलून बसत) मग काय ठरवूया? जुळयांवर फार्स लिहायचा की नाही?

**सूत्रधारिणी:** लिहूया ना! आपण दोघेही विनोदबुद्धीत मार खाणारे शास्त्रज्ञ आहोत. तेव्हा आव्हान म्हणून स्वीकारायला काय हरकत आहे?

**नट:** चालेल. पण मला वाटतं, काही पत्ते प्रेक्षकांना आधी दाखवलेले बरे. जुळयांचं नाटक म्हटलं की एक विशिष्ट डिझाईन फीचर वापरायला परंपरेचीच मान्यता असते. नाटकातले जुळे हे जुळे नसून सर्वकाहीजुळे असतात. गुणसूत्रंच नव्हे तर त्यांचे कपडेलत्तेआवाजहावभावसुद्धा एकसारखे असतात. छातीत धडकी भरावी इतकी सिमेट्री असते. ती परंपरा आपणही चालू ठेवू.

**सूत्रधारिणी:** हो! अशाच आणखी एका डिझाईन फीचरला परंपरेची मान्यता आहे, पण मला मात्र ते खटकतं. उदाहरणार्थ, ‘अंगूर’मध्ये दोन्ही सं-कुंचं नाव अशोक आहे आणि दोन्ही दे-वंचं नाव बहादुर आहे. तसं का आहे याचं थातुरमातुर स्पष्टीकरण सिनेमात दिलेलं आहे, पण ते पटत नाही. वास्तवात दोन जुळ्या भावांना तेच ते नाव कुणी देणार नाही. पण नावं जर वेगवेगळी असतील तर कथानक कोसळेल, कारण ओळखणारे अनोळखी चुकीच्या नावाने हाक मारतील.

**नट:** खरं आहे. 'मेनाएख्मी'त तेच फीचर आहे आणि 'एरर्स'मध्येही तेच आहे. दोन्हींतलं स्पष्टीकरण तितकंच थातुरमातुर आहे. (क्षणभर विचार करून) यावर एक तोडगा मला सुचतो; चालतो का बघू.

**सूत्रधारिणी:** (प्रेक्षकांकडे निर्देश करत) तो पत्ता तुला उघड करायचा नाही?

**नट:** नाही. एक गोष्ट मात्र अपारंपरिक करूया. जुळे जन्माला कसे आले आणि त्यांची ताटातूट कशी झाली ह्या सुरुवातीच्या शिप्तरभर सिनॉप्सिसचा मला वैताग येतो. 'मेनाएख्मी' आणि 'एरर्स' ह्या दोन्हींमध्ये ते चटश्राद्धासारखं उरकून घेतलेलं आहे. नाटक बघताना कुणाच्याही ते लक्षात राहात नाही. तो प्रकार टाळता आला तर मला हायसं वाटेल.

**सूत्रधारिणी:** मग असं करू: सिनॉप्सिसला टांग मारू आणि जुळ्यांची कूळकथा सांगायला आपणच शेवटी नाटकात जाऊ.

(नट उत्साहात येऊन होकारार्थी मान डोलावत उभा राहतो. सूत्रधारिणी देखील उठून उभी राहून नेकटाय सारखा करते.)

**नट:** ठरलं तर! कोण आहे रे तिकडे? (मावळ्यांसारखा पोषाख केलेले मघाचेच दोघे विंगेतून येतात.) हे बोजड सामान इथून ताबडतोब हलवा. (ते दोघे शेज लाँग आणि आरामखुर्ची विंगेत नेऊ लागतात. त्यांच्याकडे पाठीमागून पाहात) इतका आवळाजावळा पोषाख केला नसतात तरी चाललं असतं. असल्या युक्त्या वापरल्यात म्हणून आम्ही नाटकात नाही घेणार आहोत तुम्हाला —

**सूत्रधारिणी:** कशाला उगीच डिवचतोयस त्यांना? इकडे ये बघू. (प्रेक्षकांना उद्देशून) आमच्या

संभाषणावरून एव्हाना तुमच्या लक्षात आलंच असेल की आम्ही शक्य तितका निर्दोष आणि सपक फार्स लिहिणार आहोत.

**नट:** ज्यांना फार्स आवडत नाहीत अशांसाठीच तो आहे, तेव्हा प्लीज जसा असेल तसा आवडून घ्या.

**सूत्रधारिणी** आणि **नट:** (प्रेक्षकांना नमस्कार करीत) मग भेटूया तर! (दोघे आत जातात.)



## प्रवेश पहिला

(गाव: अलिबाग. स्थळ: समुद्राकाठच्या एका पैसेबाज आणि प्रशस्त बंगल्याचा व्हरांडा. काचेच्या गोलाकार टेबलाभोवती दोन वेताच्या खुर्च्या मांडलेल्या आहेत. वनमाला नावाची एक टंच आणि उफाड्याची तरुणी हलक्या हाताने साफसफाई करते आहे. झगझगीत रंगाची गावठी पद्धतीची साडी तिने चापूनचोपून नेसलेली आहे. विशेष साफसफाईची गरज नसली तरीदेखील वऱ्हांड्याचा लाकडी कठडा घासून चकचकीत करण्यात आणि काचेच्या टेबलामध्ये स्वत:चं प्रतिबिंब न्याहाळण्यात तिला मजा वाटते आहे हे दिसून येतं. 'काही बोलायाचे आहे, पण बोलणार नाही —' हे गाणं हळू आवाजात ती स्वत:शी गुणगुणते आहे. आतून एमील येतो. हा एक भारतीय चेहऱ्यामोहऱ्याचा तिशीचा तरुण आहे. समुद्राकडे तोंड करून तो एका खुर्चीवर ऐसपैस बसतो आणि समाधानाने दीर्घ श्वास घेतो.)

**वनमाला:** (नाटकीपणे हात डोळयांवर ठेवून आकाशाकडे पाहात) साहेब, सूर्य माथ्यावर आलेला आहे.

(एमील हसून मान डोलावतो. वनमाला आत जाते आणि वाईनचा रिकामा ग्लास फुलासारखा ओंजळीत धरून आणून टेबलावर काळजीपूर्वक ठेवते. पुन्हा आत जाऊन बर्फाने भरलेली एक वाईन बकेट पोटाला कवटाळून बाहेर घेऊन येते आणि टेबलावर ठेवते. व्हाईट वाईनची एक बाटली बर्फात उलटी खोचून ठेवलेली आहे. तिसऱ्यांदा आत जाऊन एक कॉर्क-स्क्रू तळहातावर तोलून घेऊन येते. मन:पूर्वक खटपट करून ती बाटलीचं बूच काढते आणि ग्लासमध्ये वाईन ओतून पुन्हा बूच लावून बाटली बर्फात सरळ खोचून ठेवते. ह्या वस्तू हाताळण्याची तिला सवय नसली तरीदेखील अप्रूप आहे हे तिच्या हालचालींवरून स्पष्ट व्हावं. तिच्या कष्टांकडे एमील मंदस्मित करत कौतुकाने पाहतो आहे.)

**एमील:** थँक यू!

**वनमाला:** नो मेन्शन! (तो वाईन चाखून बघतो. चव छान असल्याचं त्याच्या चेहऱ्यावर दिसतं.) साहेब, एक विचारू का?

**एमील:** विचार ना —

**वनमाला:** मी काय म्हणते की ह्या ग्लासाला फुलासारखा देठ का असतो?

**एमील:** असं बघ की व्हाईट वाईन ही वेळ लावत एकेक घुटका घेत चाखतमाखत पीत राहण्याची वस्तू असते. ग्लास दर वेळी असा वरून धरला तर हाताच्या उबेनं वाईन कोमट होऊन जाईल. म्हणून तो देठाकडून उचलायचा असतो.

**वनमाला:** हां! हे फार हुशार कारण झालं बरं का साहेब! (त्याने ग्लास हातात धरलेला असताना त्याच्या बोटांभोवती आपली बोटं अलगद गुंफून ग्लास उचलून स्वत:च्या तोंडाजवळ नेऊन पाहते, पण ओठ लावत नाही. ग्लास अलगद खाली आणून बोटं सोडवून घेते.) तुमचं बघून आधी मी पण असा देठाकडून धरायला गेले तर ग्लास पडता पडता वाचला.

**एमील:** त्याला सवय लागते. वाईन ग्लास कसा धरायचा हे आमच्या देशात पोरांना शाळेतच शिकवतात. मग ते आपसूक यायला लागतं.

**वनमाला:** अगं बाई! आमच्या इथे पोरांना शाळेत काही पण नीट शिकवत नाहीत. बघते ना मी! (थोडा वेळ ओठंगून उभी राहात) पण साहेब, आता विषय निघाला आहे तर आणखी एक विचारू

का?

**एमील:** अगं, विचार ना —

**वनमाला:** ही वाईन का काय म्हणता तिचा रंग काही चुन्याच्या निवळीसारखा नाही. मग हिला व्हाईट वाईन का म्हणतात?

**एमील:** याला नीट उत्तर नाही. आमच्या देशातलं भाषेचं वळणच तसं आहे समज. आता तू इथे अलिबागला राहतेस. कुठे जंगलात राहतेस का? तर नाही. तरी पण तुझं नाव वनमाला आहे की नाही?

**वनमाला:** आहे! माझ्या आईबाबांना निसर्गाची फार आवड होती. हातात हात घालून देवराईत फिरायला जायचे. (लाडात येऊन गुणगुणू लागते) जाईन विचारित रानफुला! भेटेल तिथे गं सजण मला — जाईन विचारित रानफुला!

**एमील:** पुढे?

**वनमाला:** तर असे फिरायला गेलेले असताना तिथेच एक दिवस दोघांत काहीबाही होऊन गेलं आणि मी आईच्या पोटात आले. म्हणून माझं नाव ठेवलं वनमाला. पण मला माझा धैर्यधर अजून भेटायचा आहे.

**एमील:** भेटेल. वाट पाहात राहा. पण भेटल्यावर ओळखेल का हा वेगळा प्रश्न झाला.

**वनमाला:** (किंचित गोंधळते.) काय उगीच चेष्टा करताय साहेब!

(जवळच उभी राहून थोड्या वेळाने) पण साहेब, तुम्ही स्वभावाने गोड आहात तेव्हा आणखी एक विचारूनच घेते. तुम्ही म्हणता की आमच्या देशात असं असं शिकवतात, आमच्या देशात असं असं वळण आहे. पण तुमचा देश म्हणजे कुठला म्हणायचा? दिसायला तुम्ही इथलेच दिसता —

**एमील:** त्याचं असं आहे वनमालाबाई, की माझा जन्म इथलाच भारतातला आहे. पण कुठे झाला हे मला माहीत नाही, आणि माझे आईबाप कोण हेही मला माहीत नाही. मी अगदी लहान असताना तुळजापूरच्या एका अनाथालयात ते मला टाकून गेले. एक दिवस तिथे फ्रान्समधून एक निपुत्रिक जोडपं आलं, त्यांनी मला दत्तक घेतलं आणि तिकडे घेऊन गेले. माझं नाव ठेवलं एमील. त्यांचं आडनाव मोने, त्यामुळे माझं आडनाव मोने. असा मी एमील मोने. (समोर समुद्राकडे बोट दाखवत) इथून सरळ चार हजार मैल उडत गेलं की आमचा देश लागतो.

**वनमाला:** अगं बाई! मोने! फ्रान्समध्ये ब्राह्मण म्हणून राहायचं म्हंजे अवघड आहे हो! मी असं ऐकलं की समुद्रापार गेल्यानं आर्यधर्म बुडतो —

**एमील:** अगं ते ब्राह्मण नव्हते, फ्रेंच होते. मोने म्हणजे भारतातले मोने नव्हेत — तिकडचं स्पेलिंग वेगळं असतं. शेवटी एक मुका टी असतो —

**वनमाला:** मुकाटी? म्हणजे कसं म्हणता? मुका घेण्याशी त्याचा संबंध असतो की काय? (मादकपणे कमरेत वाकून, पण एमीलच्या गालांपासून सुरक्षित अंतर राखून ओठांचा चंबू करते.)

**एमील:** च्च. तुला कसं सांगू आता?! मुका घेण्याशी नव्हे, मुकं राहण्याशी असतो.

**वनमाला:** मग तो माझा प्रांत नव्हे बरं का साहेब! पण आता विषय वाढतोच आहे तर आणखी एक

विचारते. तशी मी पहिल्यापासून चौकस बरं का!

**एमील:** हो, ते कळलं —

**वनमाला:** थँक्यू! तर मी काय विचारते की दिसायला मॅडम पण इथल्याच दिसतात. आता त्या पण तुमच्याच फ्रान्स देशातल्या का कसं?

**एमील:** त्याचं असं आहे वनमालाबाई, की तिचाही जन्म इथलाच भारतातला आहे. पण कुठे झाला हे तिला माहीत नाही, आणि तिचे आईबाप कोण हेही तिला माहीत नाही. ती अगदी लहान असताना चिपळूणच्या एका अनाथालयात ते तिला टाकून गेले. एक दिवस तिथे फ्रान्समधून दुसरं एक निपुत्रिक जोडपं आलं, त्यांनी तिला दत्तक घेतलं आणि तिकडे घेऊन गेले. तिचं नाव ठेवलं सुझन. त्यांचं आडनाव माने, त्यामुळे तिचं आडनाव माने. अशी ती सुझन माने.

**वनमाला:** अगं बाई! माने! फ्रान्समध्ये शहाण्णव कुळी मराठा म्हणून राहायचं म्हंजे अप्रूप आहे हो! मी असं ऐकलं की समुद्रापार गेल्यानं क्षात्रधर्म बुडतो —

**एमील:** अगं ते मराठा नव्हते, फ्रेंच होते. माने म्हणजे भारतातले माने नव्हेत — तिकडचं स्पेलिंग वेगळं असतं. शेवटी एक मुका टी असतो —

**वनमाला:** मुकाटी? इथे पण? (तोच अभिनय एमीलच्या दुसऱ्या गालाजवळ येऊन करते.) मुका घेण्याशी खरंच संबंध नाही म्हणता? बघा हं — कित्येकदा आपल्या देशाचं वळण आपल्यालाच नीट माहीत नसतं.

**एमील:** च्च. तुला कसं सांगू आता?! जाऊ दे. पण मुद्द्याची बाब अशी की पॅरिसमध्ये आम्ही दोघे

एका कॉलेजात होतो. तिथेच भेटलो आणि प्रेमात पडलो. मी ‘एमील’, म्हणून ती मला ‘ए’ म्हणायला लागली. ती सुझन माने, म्हणून मी तिला ‘सुमा’ म्हणायला लागलो.

**वनमाला:** पण तुम्ही वेगळंच म्हणता! शीळ घातल्यासारखं—

**एमील:** आमच्या देशात ‘उ’ असाच म्हणतात: ये, तुला शिकवतो. (तिच्या शेजारी उभा राहतो.) ‘सीमा’ म्हण बरं. (ती म्हणते.) हं. आता ओठाचा असा गोल चंबू कर आणि ‘सीमा’ म्हणः ‘सुमा’!

**वनमाला:** (त्याप्रमाणे करत दोनतीनदा म्हणून बघते) सुमा! (एमीलकडे रोखून बघत ओठांचा चंबू करून उभी राहते. मग प्रयत्नपूर्वक फ्रेंच ‘उ’ म्हणत गुणगुणू लागते:) उगीच का कांता, गांजिता—उगीच का कांता!

(गाणं बंद करून) तोंड दुखायला लागलं हो! हा उच्चार पण शाळेतच शिकायला हवा. नंतर येण्यासारखा नाही. पण ते काही असलं तरी तुम्ही आणि सुमाताई (फ्रेंच पद्धतीने ‘सु’ म्हणत) मस्त शोभू—न दिसता. (‘भू’ म्हणताना ओठाचा चंबू करते.)

**एमील:** थँक यू! आमच्या लग्नाला सात वर्षं झाली. तेव्हा म्हटलं मायदेश बघून यावा. हे अलिबाग गाव छान वाटलं. समुद्र छान वाटला. म्हणून हा बंगला तात्पुरता भाड्याने घेतलेला आहे. इथे थोडे दिवस आरामात राहू आणि मग फ्रान्सला परत जाऊ.

**वनमाला:** हे बेष्ट केलंत! सात वर्षांनी म्हणजे रुचिपालट हा पायजेच. तुम्हाला मासेबिसे खावेसे वाटले तर सांगा बरं का साहेब. मला मस्त झणझणीत पापलेट करता येतो!

**एमील:** करूया ना! सुमा परत आली की तिला विचारून बेत ठरवू.

**वनमाला:** पण आज त्या एकट्याच कशा काय फिरायला गेल्या?

**एमील:** तिला वाटलं तशी गेली. आमच्या देशात असं चालतं बरं का! वाटलं तर नवराबायको एकत्र बाहेर जातात, वाटलं तर आपापले जातात. बायकोला तिची मोकळीक असते, नवऱ्याला त्याची असते. सगळीकडे आपला लक्ष्मीनारायणाचा जोडा मिरवला पाहिजे असं काही नसतं.

**वनमाला:** चांगली पद्धत आहे हो! मी लग्न करेन ना तेव्हा मला माझी मोकळीक देणारा नवराच बघेन. खलील जिब्रान हेच म्हणून गेला आहे: जवळिकीत मोकळीक पायजे. पण साहेब, आता मोकळिकीचा विषय निघाला आहे तर एक नाजुक गोष्ट विचारते, बरं का. मी पहिल्यांदा भेटले तेव्हा मॅडमनी माझा चेहराच कुरवाळला. मी घरात शिरले की दर वेळी माझा चेहरा कुरवाळतात. असं का म्हणे? तुमच्या फ्रान्स देशात अशीच पद्धत आहे की काय?

**एमील:** हं. त्याबद्दल तुला जरा तपशीलानं सांगायला पाहिजे. मॅडमना एक दुर्मीळ रोग आहे. रोग म्हण नाही तर विकार म्हण. मॅडम मुखांधळ्या आहेत.

**वनमाला:** काही कळलं नाही —

**एमील:** मॅडमना बाकी सगळं व्यवस्थित दिसतं पण माणसांचे चेहरे ओळखू येत नाहीत.

**वनमाला:** चेहरे ओळखू येत नाहीत?! असं कसं होईल?

**एमील:** होऊ शकतं. कसं ते तुला मोघम सांगतो. असं बघ की आपण सतत काही ना काहीतरी पाहात असतो किंवा ऐकत असतो किंवा बोलत असतो किंवा लक्षात ठेवत असतो वगैरे. तर हा

सगळा कारभार मेंदूतून चालतो हे तुला ठाऊक आहे. उदाहरण घ्यायचं म्हणजे, आपण जेव्हा बोलतो तेव्हा आपले ओठ हलवण्याची जबाबदारी मेंदूच्या एक ठराविक भागाकडे असते. तो इथे असतो. (स्वत:च्या 'ब्रोकाज् एरिया'ला हात लावून दाखवतो. तीही स्वत:च्या डोक्यावर चाचपडून पाहते.) तसाच माणसांचे चेहरे ओळखणारा एक भाग मेंदूत असतो. आता भाग याचा अर्थ तो मेंदूत एकाच ठिकाणी असेल असं नाही. विखुरलेला असू शकेल. पण असतो. त्यात बिघाड झाला तर चेहरे ओळखू येत नाहीत. मग अशी व्यक्ती काय करते तर दुसरी काहीतरी खूण वापरून माणसं ओळखायला शिकते. सुमाला पहिल्यापासून समोरच्याचा चेहरा कुरवाळून बघायची सवय आहे. नाक धारदार आहे की बसकं आहे, गाल गोबरे आहेत की खप्पड आहेत, भुवया फटकून राहताहेत की जोडून राहताहेत हे सगळं हाताळून ती मनाशी नोंद करून ठेवते. प्रत्येकाच्या चेहऱ्यात वैशिष्ट्यं ही असतातच. तो अख्खा भूगोल ती एकत्र लक्षात ठेवते.

**वनमाला:** गंमत आहे! पण हे असं फारसं पाहण्यात येत नाही —

**एमील:** अशा व्यक्ती फार दुर्मीळ असतात. क्वचित एखादी भेटली तर भेटते. लुळेपांगळे काय सगळीकडेच दिसतात. तसं ह्यांचं नाही.

**वनमाला:** पण साहेब, तुम्ही मुखांधळे नाही ना? नाहीतर चान्स मारून तुम्ही पण माझा चेहरा कुरवाळून घेणार —

**एमील:** नाही, माझं तसं नाही. मला सगळे चेहरे व्यवस्थित दिसतात, तेव्हा काळजी नको करूस.

**वनमाला:** मग ठीक आहे. पण आता मीच विषय काढला आहे तर एक बोलून दाखवते बरं का. साहेब, तुम्ही चांगले आहात. मी ऐकून असायची की कुणी तरणी बाई दिसली की फ्रान्स देशातले बाप्ये लगेच आंगचटीला जायला बघतात. आता मी अशी आवाजमधल्या खिडकीचित्रासारखी

दिसते, पण तुम्ही तसे नाही वागला. मॅडम एकट्याच बाहेर गेल्या आहेत पण तुम्ही माझा गैरफायदा नाही घेतला!

**एमील:** वनमाले, मघापासून मला शंका अशी वाटते आहे की तूच माझा गैरफायदा घेशील की काय!

**वनमाला:** चला! काहीतरीच बोलता बाई तुम्ही. मी आतच जाते कशी. ('कशी या त्यजू पदाला, नाथा' हे पद गुणगुणत आत जाऊ लागते.)

**एमील:** प्लीज माझं पुस्तक देऊन जा.

**वनमाला:** देते. (फडताळातून 'कळ्यांचे निश्वास' आणून देते.)

**एमील:** हे नव्हे—

**वनमाला:** हेच घ्या. करमणूक होते. नीट वाचा. (आत जाते. एमील शांतपणे समुद्राकडे पाहात पुस्तक चाळत वाईनचे घुटके घेतो आहे. त्याच्या कपाळाला आठ्या पडू लागतात. असाच थोडा वेळ जातो. समोरच्या पुळणीवरून एक तरुणी चालते आहे. ही सुझन मानेची जुळी बहिण सुरंगा माने आहे.)

**एमील:** (तरुणीकडे लक्ष जाताच) सुमा! आलीस का परत? (ह्या प्रसंगात सुरुवातीला तो फ्रेंच पद्धतीने 'सु' म्हणतो. तरुणी दचकून बघते.) सुमा! अगं, सुमा! घर विसरलीस वाटतं — (समोर जाऊन तरुणीच्या हाताला धरून बंगल्याकडे नेऊ लागतो. ती हात झिडकारते.)

**सुरंगा:** तुम्हाला माझं नाव कसं ठाऊक?

**एमील:** अगं सुमा, असं काय करतेस? (सुरंगा त्याच्याभोवती प्रदक्षिणा घालून नाकाने हुंगत त्याचा चोहोबाजूंनी वास घेते.)

**सुरंगा:** अहो, मी तुम्हाला ओळखत नाही.

**एमील:** मला माहीत आहे. मी तुझा ए. आत्ता ओळख पटेल तुला —(असं म्हणत तिचा हात हातात घेऊन स्वत:च्या चेहऱ्यावर ठेवतो. सुरंगा किंचाळते, तसा तो दचकून बाजूला होतो. गडबड ऐकून वनमाला बाहेर येते.)

**वनमाला:** सुमामॅडम (प्रयत्नपूर्वक फ्रेंच पद्धतीने म्हणत), आलात का फिरून? (सुरंगा तिच्याभोवती प्रदक्षिणा घालून नाकाने हुंगत तिचा चोहोबाजूंनी वास घेते.)

**सुरंगा:** बाई, मी तुम्हाला ओळखत नाही.

**वनमाला:** मला माहीत आहे. साहेबांनी मला सगळं सांगितलं आहे. अहो, मी वनमाला. इथे बंगल्यात काम करते. आत्ता ओळख पटेल तुम्हाला —(असं म्हणत तिचा हात हातात घेऊन स्वत:च्या चेहऱ्यावर ठेवते. सुरंगा किंचाळते. एमील आणि वनमाला गोंधळून एकमेकांकडे पाहतात.) अहो, किंचाळताय काय अशा?

**एमील:** हिचं बिनसलंय काहीतरी.

**वनमाला:** मॅडम, तुम्हाला बरं नाही का वाटत? मी सांगते, तुम्हाला ऊन लागलं असणार. लांबून

कुठूनतरी फ्रान्स देशातून तुम्ही येणार. तिथे सगळी थंडी. इथे कोकणात उकडतं किती आणि अंगातून घाम किती जातो! त्यातसुद्धा माझ्या भरवशावर नवऱ्याला सोडून मोकळीक घेऊन तुम्ही एकुलत्या भटकणार. त्रास होईल नाहीतर काय होईल? आधी आत चला बघू.

(सुरंगा तिथेच खिळून उभी राहते. तिच्या दुसऱ्या बाजूला एमील येऊन तिचा हात धरू पाहतो.)

**सुरंगा:** (पुन्हा एमीलला हुंगत) अहो, पण मी तुम्हा दोघांना ओळखत नाही.

**वनमाला:** अशा हुंगताय काय स्वत:च्याच नवऱ्याला? (एमीलला हुंगत) अय्या, यांना व्हाईट वाईनचा कसा छान वास येतोय. तुम्हाला पण देते, म्हणजे तुम्हालाही येईल. (दोघे मिळून तिला व्हरांड्यात आणून वेताच्या खुर्चीवर बळेबळे बसवतात. वनमाला लगबगीने आत जाते.)

**एमील:** सुमा (फ्रेंच उच्चारांत), तू विश्रांती घे. तुला ऊन लागलं असणार.

**सुरंगा:** अहो, पण तुम्ही माझं नाव असं का म्हणताय?

**एमील:** बरं बाई. रोमात रमणी आणि कोंकणात कोंकणी. सुमा (सानुनासिक उच्चारांत म्हणत), तू विश्रांती घे. तुला ऊन लागलं असणार.

(वनमाला येते. तिने वाईनचा रिकामा ग्लास अभिमानाने देठाकडून धरलेला आहे. सुरंगाला ती वाईन भरून देते तशी सुरंगा तो वरच्या गोलसर भागाला ओंजळीत धरून उचलते. एमील आणि वनमाला एकमेकांकडे आश्चर्यचकित होऊन बघतात.)

**वनमाला:** मॅडम, तशी ती हाताच्या उबेनं कोमट होऊन जाईल. पटकन पिऊन टाका. (यावर गोंधळून सुरंगा सगळी वाईन पटकन पिऊन टाकते. वनमाला तिला आणखी एक ग्लास भरून देते.) फारच ऊन लागलेलं दिसतंय. आणखी एक घ्या. (सुरंगा तीही सगळी पिऊन टाकते.)

**सुरंगा:** मला गरगरतंय हो.

**वनमाला:** मॅडम, तुम्ही आत चला आणि घटकाभर निवांत पडा. तुम्हाला कुणी त्रास देणार नाही. नवरा पण त्रास देणार नाही. (एमीलचा वाईन ग्लास स्वत:च्या गालाला लावत) आमचे साहेब कसे व्हाईट वाईनसारखे शीतल मनोवृत्तीचे आहेत. उन्हातान्हातून आलेली लालबुंद खारट बायको बघूनसुद्धा त्यांचं मन विचलित होत नाही. बिनघोर चला तुम्ही — (सुरंगाला आत घेऊन जाते. एमील अनिश्चितपणे उभा राहतो, पण मग पुन्हा खुर्चीवर बसून वाचू लागतो. काही वेळाने वनमाला परत येते. एमील तिच्याकडे प्रश्नार्थक नजरेने पाहतो.)

**वनमाला:** गरागरा पंखा लावून मॅडमना झोपवलं आहे. एक डुलकी टाकली की त्यांना हुशार वाटेल. तुम्ही काळजी नका करू.

**एमील:** ठीक.

**वनमाला:** अगदी नका करू. कोंकणी हवेत माझा जन्म गेलेला आहे.

**एमील:** ठीक.

**वनमाला:** पण साहेब, मी काय म्हणते — दुपारच्या जेवणाला काय करायचं?

**एमील:** (विचार करून) तू नेहमी झणझणीत पापलेट करतेस म्हणालीस ना? आज व्हाईट वाईन टाकून फ्रेंच पद्धतीचा पापलेट करू. लोणसर आणि गोडसर असतो. कसा करायचा ते मी दाखवतो.

**वनमाला:** अगं बाई!

**एमील:** मी सांगतो तेवढं बाजारातून पटकन आणायचं: पापलेट —

**वनमाला:** आणते!

**एमील:** लोणी —

**वनमाला:** घरात आहे!

**एमील:** ते द्राक्षाएवढे छोटे कांदे असतात ते मिळतील का?

**वनमाला:** आणते. बाजारात एक मद्रासी बसतो, त्यांना तो सांबार कांदे म्हणतो —

**एमील:** व्हाईट वाईन —

**वनमाला:** इथेच आहे! (उत्साहाने हात पदराला पुसते आणि पदरातच धरून वाईनची बाटली उचलते.) साहेब, मला इंग्रजी अक्षरं येतात बरं का! तुम्हाला वाचून दाखवते.

**एमील:** वनमालाबाई, इंग्रजी अक्षरं असं काही नसतं. त्यांना रोमन अक्षरं म्हणतात.

**वनमाला:** म्हणू देत. तुम्हाला वाचून दाखवते. (अक्षरं लावत) पि-नॉट् ग्रि-गि-ओ.

**एमील:** नाही. (मांडी घालून खाली बसतो आणि आईस बकेटमध्ये बोट बुचकळून शहाबादी फरशीवर अक्षरं उमटवतो. वनमाला त्याच्या पाठीमागून अर्धवट ओणवी होऊन पाहते.) माझं ऐकून नीट म्हण. पीऽ-न्यो, ग्रीऽ-ज्यो. 'न' ला जोडलेला 'य' स्पष्ट म्हणायचा नाही. 'नो' अर्धवट म्हणून झाल्यानंतर त्यावर 'य' ची नुसती सावली पाडायची. पुन्हा ऐक. पीऽ-न्यो, ग्रीऽ-ज्यो.

**वनमाला:** पीऽ-न्यो, ग्रीऽ-ज्यो! (बाटलीवरच्या चिठ्ठीकडे बघत) पण साहेब, हा टी म्हणायचा नाही?

**एमील:** नाही. मुका टी म्हणजे काय ते आता कळलं ना?

**वनमाला:** (चमकून) हाच तो मुका टी होय?! आता कळलं! पीऽ-न्यो (डाव्या हाताच्या तळव्याने स्वत:चा ब्रोकाज् एरिया क्षणभर झाकून घेत) ग्रीऽ-ज्यो! पण साहेब, म्हणायचा नाही तर तो लिहिलाय कशाला?

**एमील:** आमच्या देशात तशीच पद्धत आहे. चल आता — (उठून उभा राहतो आणि वाईन ग्लास उचलून घेऊन आत जाऊ लागतो.)

**वनमाला:** आहे तर आहे. चलते! साहेब, तुम्ही गोड आहात. लग्न करेन तेव्हा असा जोडीनं स्वयंपाक करणारा नवरा बघूनच करेन. (बाटली परत बर्फात खोचून बकेट पदरात कवटाळून गुणगुणत नाचाची पावलं टाकत त्याच्या मागोमाग जाते: 'मला मदन भासे हा, मोही मना या — मोही मना या!')

✲

## प्रवेश दुसरा

(पोटऱ्या अर्धवट बुडतील इतपत पाण्यात उभी राहून सुझन माने समुद्राकडे पाहते आहे. पुळणीवर उभा असलेला एकनाथ मोने तिच्याकडे एकटक निरखून पाहतो आहे. ह्या प्रवेशामध्ये सुझन आणि एकनाथ यांची स्वगत भाषणं येतील. यांपैकी कोणतंही एक पात्र बोलत असताना दुसरं निश्चल अवस्थेत जाईल.)

**एकनाथ:** (स्वगत) मध्यान्हीचे प्रखर किरण जिच्या सुडौल अवयवांवर अनिर्बंध बागडताहेत अशा माझ्या लालबुंद आणि खारट प्रियपत्नीकडे पाहून मनाला विषयाचा स्पर्श झाल्याखेरीज राहात नाही. परंतु आमचा संसार नव्या नव्हाळीचा असताना माझ्या उत्कट कामेच्छांना ती जसा भरभरून प्रतिसाद देत असे तसा आताशा देत नाही, हे एक शल्य माझ्या अंत:करणात अंकुर धरू लागलं आहे. रोखठोक आणि मोजक्या शब्दांत सांगायचं तर आमचं सहजीवन थंडावू लागलं आहे. सुमाशी माझं लग्न झाल्याला सहा वर्षं झाली. मी ब्राह्मण आणि ती क्षत्रिय असा तो आंतरजातीय संबंध असल्यामुळे दोन्हीही कुटुंबांकडून आम्हाला जोरदार विरोध झाला. त्यावेळच्या कुरबुरींना व कलागतींना लहानमोठ्या प्रसंगी खतपाणी मिळून त्या उत्तरोत्तर बळावत गेल्या आणि ह्याचा परिणाम म्हणून त्रासिकपणाचं एक सावट सुमाच्या स्वभावावर कायमचंच पडून गेलं. मात्र एकदा असं झाल्यानंतर प्रणयाच्या प्रारंभीची उत्स्फूर्त प्रीतिभावना कोमेजून जाऊन मलूल दिसू लागावी यात नवल ते काय? शंभरातल्या नव्व्याण्णव जोडप्यांच्या बाबतीत अतिपरिचयामुळे जे आपसूक होऊ लागतं त्याला आम्हा दोघांच्या बाबतीत पारिवारिक अशांततेमुळे चालनाच मिळाली म्हणायची.

आता ती हलक्या पावलांनी पाण्यातून किनाऱ्यावर येईल आणि मला ओळखण्यासाठी नेहमीप्रमाणे चोहोंबाजूंनी हुंगू लागेल. मी इथे डोळे मिटून अळीमिळी गुपचिळी उभा राहतो कसा! तिने कितीही

भरभरून वास घेतला तरीदेखील मी काहीसुद्धा प्रतिक्रिया द्यायचा नाही. मग बघूया काय करते ते!

(डोळे मिटून न हलता उभा राहतो. काही वेळाने सुझन पाण्यातून बाहेर येते आणि एकनाथच्या दिशेने चालू लागते. ती त्याचा चेहरा कुरवाळते तसा तो आश्चर्यचकित होतो, पण आनंदूनही जातो.)

**सुझन:** ए—,

**एकनाथ:** (खिदळत) अगं सुमे, अशी लाडात काय येतेस!? गुदगुल्या होताहेत ना मला!

**सुझन:** (स्वगत) हं! आज स्वारीची लहर काही वेगळीच दिसते आहे. एरवी माझा एमील म्हणजे वागण्याबोलण्यात कसा संयत आणि समतोल! अख्खं आयुष्य गॉलप्रदेशात जाऊनही तिथल्या पुरुषांच्या आततायी प्रणयोत्सुकतेची बाधा त्याला झालेली नाही. त्याला ओळखण्यासाठी त्याचा चेहरा मी रोजच नाही का कुरवाळत? परंतु शीतकपाटात ठेवलेल्या कणकेच्या गोळयाला कुरवाळावं यापेक्षा जास्त चेतना त्याच्या स्पर्शातून मला कित्येक वर्षांत जाणवलेली नाही. पण याउलट आज पहा ना! त्याचा चेहरा मदनज्वराने असा उष्ण झाला आहे की माझ्या हातांना अंमळ चटकाच बसला. आणि माझ्या नावाचा उच्चारही त्याने अशा काही आगळया प्रकारे केला की जणू मी त्याची सात वर्षं मुरलेली लग्नाची बायको नसून वेगळीच कुणी असावे. खचितच त्याच्या मनात कसल्यातरी वात्रटपणाचे बेत शिजताहेत आणि तो मला काहीतरी संकेत देऊ पाहतो आहे. काय बरं त्याचा हेतू असेल?

(क्षणभर विचार करून) हं! असं तर नसेल?! पॅरिसमध्ये कॉलेजात असताना 'The Hitchhiking Game' नावाची मिलान कुंदेराने लिहिलेली लघुकथा मी आणि एमीलने बिछान्यात लोळत

एकमेकांच्या कमरेभोवती हात टाकून वाचून काढली होती. तेव्हा ती बाळबोध वाटली होती, परंतु तिच्यामागची मध्यवर्ती कल्पना मात्र आम्हा दोघांना आवडली होती. एक तरुण आणि एक तरुणी सहलीवर गेलेले असतात. पण अचानक एका क्षणी परस्परांच्या मूकसंमतीने अशी बतावणी करू लागतात की आपण एकमेकांना अनोळखी आहोत आणि योगायोगाने नुकतेच भेटलो आहोत. मला वाटतं हाच संकेत एमीलच्या मनात असावा, कारण आम्ही दोघे खरोखरीच सहलीवर आलो आहोत. तेव्हा मी असं करते: मला एमील अनोळखी आहे अशी बतावणी करून पाहते. बघू या तो तसाच प्रतिसाद देतो का! लघुकथेचा शेवट जसा होतो तसाच ह्याही प्रसंगाचा झाला तर मात्र मोठी मौज होईल.

(प्रकट) सॉरी हं, माझा काहीतरी गैरसमज झाला असावा. मी तुम्हाला ओळखलं नाही.

**एकनाथ:** (स्वगत) हूं! आज माझ्या प्रियपत्नीची लहर काही वेगळीच दिसते आहे. चक्क म्हणते आहे की मी तुम्हाला ओळखलं नाही! कित्येक वर्षांपूर्वी कुलाबा जिल्ह्याच्या कलेक्टर कचेरीत काम करीत असताना जेवणाच्या सुट्टीत आमची ओळख झाली. अशाच एका भेटीत 'एकदा काय झालं' नावाची गौरी देशपांड्यांनी लिहिलेली लघुकथा सुरंगाने आणि मी एकाच चमच्याने कांदेपोहे खात डोक्याला डोकं लावून वाचून काढली होती. तेव्हा ती भंपक वाटली होती, पण तिच्यामागची मध्यवर्ती कल्पना मात्र आम्हा दोघांना आवडली होती. एक नवराबायको आपापल्या कामाच्या निमित्ताने गावात अचानक एकाच ठिकाणी येतात. परस्परांच्या मूकसंमतीने ते अशी बतावणी करू लागतात की एकमेकांना आपण अनोळखी आहोत आणि योगायोगाने नुकतेच भेटलो आहोत. मला वाटतं हाच संकेत सुमाच्या मनात असावा, कारण आम्ही दोघे आमच्याच गावात खरोखरीच अचानक भेटतो आहोत. तेव्हा तिची ही खेळी बरोब्बर ओळखून मीही तसाच प्रतिसाद देतो. लघुकथेचा शेवट जसा होतो तसाच ह्याही प्रसंगाचा झाला तर मात्र मोठी बहार येईल.

(प्रकट) जाऊ द्या हो. होतं असं कधी कधी! पण आमच्या गावात तुम्ही नव्या दिसता.

**सुझन:** हो, नवी आहे खरी. माझा जन्म ह्याच देशात झाला, पण काही कारणाने मी परदेशात वाढले. आता का आणि कशी यात नाही बाई पडत! पहिल्याच भेटीत कशाला मेलं रडगाणं गायचं ते?! पण आपल्या मायभूमीची ओढ वाटू लागली, तशी आले परत. चार दिवस समुद्राकाठी राहीन, आणि मग जाईन चिमणीसारखी भुर्र उडून.

**एकनाथ:** मोठ्या भाग्यवान बुवा तुम्ही. परदेशी राहणाऱ्यांचा मला भारी हेवा वाटतो. मी आपला इथेच जन्मलो आणि इथेच वाढलो. आमची धाव कुंपणापर्यंतच!

**सुझन:** इतक्या छानशा टुमदार गावात राहणाऱ्यानं दुसऱ्या कुणाचा हेवा तो कशाला करावा?

**एकनाथ:** बरं बुवा! आता आमचा गाव तुम्हाला आवडला ह्यातच आम्ही काय ती फुशारकी वाटून घेऊ. पण तुमच्यासारखी चार गावचं पाणी प्यालेली, देखणी, आधुनिक स्त्री अहोजाहो करू लागली की अकाली पोक्त झाल्यासारखं वाटतं! मी तर म्हणतो की मला एकेरीच हाक मारा.

**सुझन:** आता मला तुमचं नावदेखील ठाऊक नाही तर हाक ती कशी मारणार? आणि मला बाई परपुरुषाला अरेतुरे करायला संकोच वाटतो. आमच्या परदेशी भाषेचं वळण तसं नाहीच मुळी. मी आपली तुम्हाला 'अहो ए—' म्हणेन. यापेक्षा जास्त एकेरीवर येणं मला नाही जमायचं. चालतं का पाहा!

**एकनाथ:** आता तुम्ही इतक्या स्नेहानं म्हणणार तर का नाही चालणार बरं?

**सुझन:** पण माझ्यासारख्या चार गावचं पाणी प्यालेल्या, देखण्या, आधुनिक स्त्रीशी घसट वाढवायची तर माझं नाव परदेशी उच्चारांत नीट म्हणावं लागेल. जमेल का तुम्हाला?

**एकनाथ:** अहो, मी आपला साधाभोळा कोंकणी माणूस. तुमचा तो परदेशी उच्चार मला कसा ठाऊक असेल? तुम्हीच शिकवलंत तर आशा आहे.

**सुज्ञन:** शिकवते. असे माझ्याजवळ उभे राहा. 'सीमा' म्हणा बरं. (तो म्हणतो.) हं. आता ओठाचा असा गोल चंबू करा आणि 'सीमा' म्हणा: 'सुमा'!

**एकनाथ:** (दोनदा म्हणतो.) गोड नाव आहे. अंगावर शिरशिऱ्या येताहेत.

**सुज्ञन:** बरं, बरं! इतकं काही कौतुक करायला नको आहे. तुमच्या बायकोनं ऐकलं चुकून तर जळफळेल मेली!

**एकनाथ:** (व्यथित झाल्याचा अभिनय करत) सुमादेवी, सहज थट्टा करता करता मनावरची खपली काढलीत ना?!

**सुज्ञन:** (अपराधी वाटल्याचा अभिनय करत) असं हो का म्हणता? बायकोचा विषय निघताच अचानक खिन्नसे झालात?

**एकनाथ:** झालो खरा. पण जाऊ द्या तो विषय. थोड्या दिवसांसाठी आमच्या गावी पाहुण्या आला आहात. गृहछिद्रं सांगून कशाला उगीच तुमच्या आनंदात विरजण कालवू?

**सुज्ञन:** तेही खरंच. आपली चार क्षणांची ओळख. पुढे टिकेल, न टिकेल. पण एक सांगू का? छोटीमोठी गृहछिद्रं सगळ्याच संसारांत असतात. आता मीदेखील विषय नाही वाढवत; तुम्ही शहाणेसुरते आहात तेव्हा उमजून घ्यालच —

**एकनाथ:** समजलो. पण मला फिरून फिरून वाटतं की आपली ओळख अशी विरून नाही जायची. यदाकदाचित टिकली आणि वाढली तर एकदा मन मोकळं करेन तुमच्याजवळ.

**सुझन:** मी पण करेन.

**एकनाथ:** एका नव्या नात्याची ती सुरुवात ठरेल.

**सुझन:** हो.

**एकनाथ:** पण तो विषय आज नको.

**सुझन:** आज नको. आज आपण हलक्याफुलक्या मनानं राहू. मी सुट्टीवर आले आहे ना? मग तुमचा गाव नको का बघायला? काय काय दाखवाल मला?

**एकनाथ:** इथे एक जुना किल्ला आहे आणि एक जुनं देऊळ आहे. दोन्ही सुरेख आहेत. पण गावातली माझी खास आवडीची जागा कोणती आहे सांगू? पुळणीवरून असंच पुढे चालत गेलं की वळचणीला एक पोफळीचा बाग आहे. आता एवढं कबूल की तुमच्या परदेशी उद्यानांसारखा तो आखीवरेखीव आणि नखरेबाज नव्हे. हा आपला वेडाबागडा आणि ऐसपैस आहे. दुपारी अगदी निवांत आणि निर्जन असतो. याल बघायला?! मला फार आनंद वाटेल तुम्ही आलात तर —

**सुझन:** अग्गोबाई! फारच धिटावलात हो तुम्ही. परपुरुषाबरोबर अशी कशी भलत्यासलत्या जागी येऊ मी?

**एकनाथ:** अंमळ धीटपणा झाला खरा! पण आता तुमच्यासारख्या आधुनिक स्त्रीसमोर बुजून ते कसं चालेल? मी तर बुवा ऐकलं की अशा स्त्रियांना आत्मविश्वासानं मुसमुसणारा तरुणच आवडतो. हे आमचं आपलं पुस्तकी पांडित्य बरं का! लघुकथा वाचून कमावलेलं!

**सुज्ञन:** कळतात हो असली बोलणी. आम्ही काय कुठे लघुकथा नाही वाचत वाटतं?

**एकनाथ:** तुम्ही त्या वाचत असणार अशी तुमच्याकडे पाहूनच खात्री पटली माझी. चेहरा का कुठे खोटं बोलतो?!

**सुज्ञन:** हो ना! खूण पटलीच म्हणायची. पण वाचनाचे षौकीन असाल तर एक गोष्ट तुम्हाला नक्की ठाऊक असणार. लघुकथा ताणायची नसते—

**एकनाथ:** मान्य! कथेचा शेवट मात्र फार महत्त्वाचा असतो. तो चपखल जमून यायला हवा.

**सुज्ञन:** रचनेमागे धोरण असेल तर का बरं नाही येणार?

**एकनाथ:** हे अगदी नेमकं बोललात! मग येताय तर?

**सुज्ञन:** येते बापडी. तुम्ही चांगल्या मनाचे आहात आणि तुमच्यावर विसंबायला हरकत नाही अशी मी आपली समजूत करून घेतली आहे. धोका तर नाही ना देणार मला?!

**एकनाथ:** नाही हो. बेलाशक चला तुम्ही.

**सुज्ञन:** (पालथा पंजा पुढे करते.) परदेशी पद्धत!

(एकनाथ किंचित गोंधळतो, पण तिच्या हाताचं चुंबन घेतो. कोपऱ्यांशी हातात हात अडकवून एकमेकांना बिलगून दोघे चालू लागतात.)



## प्रवेश तिसरा

(वनमाला आणि एमील बंगल्याच्या आतल्या भागातून वऱ्हांड्यात येतात. दोघेही किंचित घामेजलेले आहेत. एकेक पेला माठातलं गार पाणी पिऊन घेतात आणि एकमेकांकडे पाहून मंदपणे हसतात. वनमाला डोळे मिटून हाताची घडी घालते.)

**वनमाला:** कायकाय केलं ते एकदा मनाशी आळवून घेते म्हणजे नंतर विसरायची नाही. पसरट भांड्यात जैतुनाचं तेल गरम करायचं आणि मीठमिरी चोळलेला मासा त्यात शिजवून घ्यायचा. मग तो बाहेर काढून ताटकळत ठेवायचा. चिरलेला कांदा, वाईन आणि लिंबाचा रस त्याच भांड्यात टाकून परतून घ्यायचं. वरून लोणी टाकायचं आणि ते वितळलं की मिश्रण गाळून घ्यायचं. सॉस तयार झाला की ताटकळलेला मासा त्यात पोहायला सोडायचा!

**एमील:** बरोब्बर.

**वनमाला:** (डोळे उघडत) नवं शिकत राहायला मला आवडतं. अजून दोनदा केलं की हातात बसेल.

**एमील:** हो. आणि भारतातल्या जुन्या पठडीच्या बायकांसारखं करायचं नाही. स्वयंपाक करत असताना पदार्थाची चव घेऊन बघायला डगमगायचं नाही. अंदाज त्यामुळेच सुधारतो.

**वनमाला:** कबूल! आता पानं घेते आणि मॅडमना उठवते. अजून बहुतेक झोपल्याच आहेत.

**एमील:** तुझंही घे.

**वनमाला:** तसं नको. इथली पठडी वेगळी आहे. तुम्हाला वाढून मग मी घेते.

(कामाला लागते. दोन पांढऱ्याशुभ्र प्लेट्स, सुऱ्याकाटेचमचे, नॅपकिन, पेले, पाण्याचा जग अशा अनेक वस्तू काचेच्या टेबलावर वेगाने हालचाली करत उत्साहाने मांडते आहे. एमील 'ती बहु चपल वारांगना—' गुणगुणतो आहे.)

**वनमाला:** आवाज छान आहे तुमचा, साहेब. पण बघा हं — संशयकल्लोळातलं पद म्हणताहात. उगीच कुठे अपशकून नको व्हायला. (एमील स्मितहास्य करत गुणगुणणं चालूच ठेवतो.) सुरी वापरायला जास्त ताकद लागते, म्हणून ती उजव्या हाताशी. काटा वापरायला कमी ताकद लागते म्हणून तो डाव्या हाताशी. हुशार पद्धत आहे! (काम संपवते. टेबल मांडून तयार आहे.) आलेच मी. (आत जाते. थोड्या वेळाने पडद्यामागून) साहेब! मॅडम कुठे गेल्या?!

**एमील:** कुठे गेल्या म्हणजे?

**वनमाला:** (पडद्यामागून) घरात दिसत नाहीत! (एमील आत जातो. दारं आपटल्याचे आणि 'सुमा', 'सुमामॅडम' अशा हाका मारल्याचे आवाज. दोघेही पुन्हा बाहेर व्हरांड्यात येतात.) त्यांचं काहीतरी बिघडलंय—

**एमील:** मलाही तीच शंका येते आहे.

**वनमाला:** साहेब, मी काय विचारते — त्यांना झोपेत चालायची सवय नाही ना? मी ऐकलं की तुमच्या तिकडच्या एका राणीला अशी हात चोळत झोपेत चालायची सवय होती. (अभिनय करून दाखवते.)

**एमील:** नाही, हिचं तसं काही नाही. आधीच मुखांधळी आणि वर झोपेत चालते म्हणजे दुर्मीळ

लक्षणांची परिसीमा झाली असती. पण तू राणी म्हणतेस ती आमची नव्हे. आम्ही फ्रान्स, ती स्कॉटलंड.

**वनमाला:** मॅडमशी भांडण नाही ना केलंत?

**एमील:** केव्हा करणार?! मी तुझ्याचबरोबर स्वयंपाकघरात नव्हतो का?

**वनमाला:** त्यालाच त्या भांडण समजल्या असतील. बघा — मी संशयकल्लोळाचं म्हणाले होते की नाही?

**एमील:** छे! तिचा स्वभाव असा नाही हं.

**वनमाला:** मग काय कारण असेल?

**एमील:** काही सुचत नाहीय.

**वनमाला:** साहेब, तुम्ही घरीच थांबा. मी जाऊन बघून येते. टीचभर तर गाव आहे. जाणार कुठे त्या? (एक ऐटबाज गवती हॅट डोक्यावर ठेवून 'आल्हादक मुखचंद्रही होता—' हा चरण गुणगुणत बाहेर पडते. एमील कठड्यावर हात ठेवून अनिश्चितपणे उभा राहतो.)



## प्रवेश चौथा

(सुझन अंग ताणून वाळूत पालथी पडली आहे. तिच्या शेजारी बसलेल्या एकनाथने हलकेच तिच्या पाठीवर हात ठेवला आहे. ह्या प्रसंगातलं संभाषण सातत्याने तुटक आहे.)

**सुझन:** अंगभर गोड शिरशिरी आहे.

**एकनाथ:** ग्लानी येते आहे.

**सुझन:** स्वल्पमरण.

**एकनाथ:** म्हणजे?!

**सुझन:** आमचा खास परदेशी शब्द आहे. विशिष्ट प्रसंगी वापरतात. तुम्हाला नाही कळायचा!

**एकनाथ:** तुम्ही आधुनिक परदेशी बायका मोठ्या लबाड असता. भोळ्याभाबड्या कोंकणी तरुणांना नादी लावता. त्यांना समजणार नाहीत असे शब्द मुद्दाम वापरता.

**सुझन:** असं करता येणं हाही मायदेशीच्या आकर्षणाचा एक भाग आहे. (एकनाथ पराभूत हास्य करतो. दोघेही थोडा वेळ अबोल आहेत.)

**एकनाथ:** (डोळे मिटून) तीळ. तीळ — लक्षवेधी आहे. जणू नव्याने दिसला.

**सुझन:** (अनिश्चित) अं? दृष्टिकोणामुळे फरक पडत असावा.

**एकनाथ:** (अनिश्चित) तसं असू शकेल. (दीर्घ श्वास घेत) काय बरं केलं आपण?

**सुझन:** खेळ मांडियेला.

**एकनाथ:** वाळवंटी घाई.

**सुझन:** पण आता ती संपली. (काही क्षणांनंतर) ए—, मला आता थोडा वेळ एकटी सोडाल? जे घडलं त्यावर विचार करीन म्हणते.

**एकनाथ:** मी तेच सुचवणार होतो. जवळिकीनंतर मोकळीक हवी. खलील जिब्रान असंच काहीसं म्हणाला होता. (तो उभा राहतो. वाळूत लोळणारी सुझन त्याचा हात धरून अलगद उठते.) पुन्हा कधी भेटायचं?

**सुझन:** असेच अचानक भेटू. केव्हा आणि कुठे हे कुणी सांगावं?!

**एकनाथ:** मी वाट बघेन. मन्मनांच्या तारा जुळलेल्या असल्या म्हणजे शरीरांची भेट आपसूक होईल.

**सुझन:** ठीक तर! भेटूच. केव्हातरी कुठेतरी —

**एकनाथ:** पण लवकरच! येतो मी.

(दोघे आवेगाने एकमेकांचं चुंबन घेतात. सुझन एकनाथचा चेहरा कुरवाळते. एकनाथ जातो. सुझन

वाळूत ठेवलेल्या चपला उचलते आणि क्षणभर थांबून काहीशा व्यग्र मनाने चालू लागते. चपला हातात घेऊन पुळणीवरून विरुद्ध दिशेने चालणारी सुरंगा माने तिला सामोरी येते. एकमेकींना पाहताच त्या थबकतात. दोघींनाही संशय आलेला आहे, पण का ते त्यांनाच नीट कळलेलं नाही.)

**सुरंगा:** नमस्कार.

**सुझन:** नमस्कार.

**सुरंगा:** तुम्ही मला ओळखता का?

**सुझन:** बहुतेक नाही. पण खात्री वाटत नाही.

**सुरंगा:** मलाही खात्री वाटत नाही.

(हातातल्या चपला खाली ठेवून दोघी सामोऱ्या उभ्या राहतात. अंदाज घेत हळूहळू सुरंगा सुझनला प्रदक्षिणा घालत हुंगू लागते. सुझन हात पुढे करून सुरंगाचा चेहरा कुरवाळू पाहते, पण सुरंगा तिच्या हातांच्या कक्षेत येत नाही.)

**सुरंगा:** ए —

**सुझन:** ए?

**सुरंगा:** ए!

**सुज्ञन:** काय हो? एकदम अशा एकेरीवर का येताय? मॅनर्स नाहीत का तुम्हाला?

**सुरंगा:** प्रश्नच नाही! अरे ए!

**सुज्ञन:** आंधळ्या आहात का तुम्ही?

**सुरंगा:** काय हो, आंधळी कुणाला म्हणता?!

**सुज्ञन:** मग 'अरे ए' काय म्हणता?! मी बाई आहे. बुवा नव्हे.

**सुरंगा:** बाई आहात की बुवा आहात ते तुम्ही ठरवा, पण तुमच्या अंगाला माझ्या नवऱ्याचा वास का येतोय?

**सुज्ञन:** कुणाचा?!

**सुरंगा:** तुमच्या अंगाला माझ्या नवऱ्याचा जबरदस्त वास येतो आहे.

**सुज्ञन:** अहो, असा कसा येईल? यायचाच झाला तर माझ्या अंगाला माझ्या नवऱ्याचा वास नाही का येणार?

**सुरंगा:** चांगला घमघमाट सुटला आहे. म्हणून तर मी 'ए —' म्हणाले. माझ्या नवऱ्याला मी 'ए' म्हणते.

**सुज्ञन:** माझ्याही नवऱ्याला मी 'ए'च म्हणते.

**सुरंगा:** म्हणत असाल. पण म्हणून तुमच्या नवऱ्याचा वास माझ्या नवऱ्यासारखा कसा असेल?

**सुज्ञन:** पण ही वासाची भानगड काय आहे? इतकं नाक फुगवून फेंदारून वास घेताय कशाला?

**सुरंगा:** कारण मी वासावरून माणसं ओळखते. मला डोळ्यांनी व्यवस्थित दिसतं पण माणसांचे चेहरे ओळखता येत नाहीत. लहानपणापासून माझं असंच आहे.

**सुज्ञन:** मलाही माणसांचे चेहरे ओळखता येत नाहीत. लहानपणापासून माझंही असंच आहे. म्हणून मी हातांनी चेहरे चाचपडून माणसं ओळखते.

**सुरंगा:** पण असं का आहे आपल्या बाबतीत?

**सुज्ञन:** ते आता ठाऊक नाही. लोक म्हणतात आपल्या मेंदूचं वायरिंग निराळं आहे. पण प्रत्यक्षात मेंदूत तारा कुठेच नसतात. ते काही असो; आपलं जे आहे त्याला मानसशास्त्राच्या पुस्तकात अधिकृत नाव आहे: प्रोसोपॅग्नोसिया!

**सुरंगा:** काय?! प्रोसो—

**सुज्ञन:** प्रो-सो-पॅग्नो-सिया.

**सुरंगा:** प्रो-सो? च्च. फार आडनिडा शब्द आहे. जीभ तशी वळत नाही हो.

**सुज्ञन:** आपण मुखांधळ्या आहोत असं म्हणा.

**सुरंगा:** मुखांधळ्या?!

**सुज्ञन:** फार दुर्मीळ आहोत आपण. लाखात एक. गेलाबाजार लाखात दोन म्हटलं तरीही दुर्मीळच आहोत.

**सुरंगा:** पण अधिकृत नाव सांगितलंत ते एक बरं झालं. त्यामुळे दिलासा वाटला. नाहीतर आत्तापर्यंत चाचपडल्यासारखं होत होतं.

**सुज्ञन:** हो, पण ही बरी होण्यासारखी गोष्ट नाही. आयुष्यभर आपण दुर्मीळच राहणार.

**सुरंगा:** आता आहे ते आहे. (आवेश गोळा करून) पण मूळ मुद्दा सोडू नका! तुम्हाला माझ्या नवऱ्याचा वास का येतोय ते सांगा!

**सुज्ञन:** मला वाटतं ह्या सगळ्यात कसलंतरी गौडबंगाल आहे. आपण एकमेकींवर गुरगुरून काही होणार नाही. दोघींनी मिळून काय तो छडा लावला पाहिजे. तुम्ही जरा स्थिर उभ्या राहाल का? तुमचा चेहरा मी कुरवाळून बघते. तेवढा वेळ श्वास रोखून धरा म्हणजे वास येणार नाही.

**सुरंगा:** लवकर आटपा.

(सुज्ञन तिचा चेहरा कुरवाळते. मग गोंधळून स्वत:चा चेहरा कुरवाळते. मग पुन्हा सुरंगाचा चेहरा चाचपते.)

**सुज्ञन:** तुमचा चेहरा अगदी माझ्याचसारखा कसा आहे?

**सुरंगा:** काय म्हणता?!

**सुझन:** तुमचा तोंडवळा आणि माझा तोंडवळा! कुठेही काहीही फरक नाही.

**सुरंगा:** (स्वत:ची काख उचलून वास घेते.) पण वास वेगळा आहे हो!

**सुझन:** अहो, वासाचं काय घेऊन बसलात? चेहरा तर तंतोतंत सारखा आहे ना! याचा अर्थ आपण जुळ्या बहिणी असणार!

**सुरंगा:** छे हो! तसं कसं शक्य आहे? मला जुळी बहीण असती तर माझ्या आईबाबांनी तसं मला सांगितलं नसतं का?

**सुझन:** आईवडिल कोण तुमचे?

**सुरंगा:** आम्ही माने! शहाण्णव कुळी मराठा आहोत म्हटलं!

**सुझन:** माझंही आडनाव माने!

**सुरंगा:** अय्या! तुम्ही पण शहाण्णव कुळी?!

**सुझन:** च्च. नाही हो. आम्ही भारतातले माने नव्हेत. स्पेलिंग वेगळं आहे, त्यामुळे आपला पदर जुळायचा नाही. मूकव्यंजन ही भाषिक संकल्पना तुम्हाला माहीत आहे का?

**सुरंगा:** मला असलं काही माहीत नसतं. मी अलिबागेत वाढलेली अस्सल शहाण्णव कुळी मराठा बाई आहे. माझं नाव सुरंगा माने. माझा नवरा अलिबागेतच वाढलेला आहे. त्याचं नाव एकनाथ मोने. तो ब्राह्मण आहे. आम्ही दोघेही कलेक्टर कचेरीत नोकरीला असतो. तिथेच ओळख झाली. जातीबाहेर लग्न म्हणून त्याच्या आणि माझ्या दोन्ही कुटुंबांतून कडाक्याचा विरोध झाला. पण आम्ही जुमानलं नाही.

**सुझन:** असं म्हणता?

**सुरंगा:** सासरच्यांवर मी इतकी उखडले होते की लग्नानंतर आडनाव बदललं नाही.

**सुझन:** चांगलं केलंत. सुमो नावाचे जपानी मल्ल असतात.

**सुरंगा:** लग्नाला सहा वर्षं झाली, पण अजून मी कुणालाही माफ केलेलं नाही.

**सुझन:** ते समजण्यासारखं आहे.

**सुरंगा:** माझं आहे ते आहे, पण तुमची ओळख काय?

**सुझन:** सांगते. मी सुझन माने —

(तेवढ्यात 'सुमाताई! अहो, सुमाताई!' अशी हाक येते. दोघीही दचकून तिकडे पाहतात. वनमाला जवळ येते.)

**वनमाला:** अग्गो बाई! तुमच्यातल्या सुमाताई कोण म्हणायच्या?

**सुज्ञन:** मी.

**सुरंगा:** मी पण. (दोघी तिला गराडा घालतात. एकजण तिचा वास घेते तर दुसरी चेहरा कुरवाळते.)

**वनमाला:** (स्वत:ला सोडवून घेत) अग्गो बाई! दोन आवळ्याजावळ्या मांजरी अंगावर चढल्यागत वाटलं!

**सुरंगा:** त्या तिकडच्या बंगल्यातल्या आगाऊ बाई तुम्हीच का? वास तसाच येतोय.

**वनमाला:** मीच ती. मला वनमाला म्हणतात. पण माझा धैर्यधर मला अजून भेटायचा आहे.

**सुरंगा:** तो भेटेल हो, पण आवळ्याजावळ्या कुणाला म्हणता?! ह्या मानेबाई पण मला तेच म्हणाल्या. मला जुळी बहीण असती तर आईबाबांनी सांगितलं असतं ना तसं —

**वनमाला:** अहो, खुळ्या का काय तुम्ही?! तुमच्या आईबाबांनी लोणकढी थाप मारली तुम्हाला. तुम्ही दोघी जुळ्या बहिणी नव्हेत हे नाटकातसुद्धा शक्य नाही! तोंडं बघा नुसती!

**सुज्ञन:** आता ती बघता आली असती तर काय हवं होतं?!

**वनमाला:** हो! ते एक मी विसरलेच होते. (दोघींकडे आळीपाळीने बघत राहते.) पण मला एवढं आश्चर्य पूर्वी कधी वाटलं नव्हतं हो! तुम्ही दोघी जन्मलात कशा, नंतर गेलात कुठं आणि आत्ता इथे भेटताय कशा?! सगळंच मजेशीर असणार!

(सुझन वनमालेला बाजूला घेऊन तिच्या कानात बराच वेळ काहीतरी कुजबुजते. वनमाला ते लक्षपूर्वक ऐकून घेते, तसं तिचं आश्चर्य वाढत जातं. पण शेवटी तिला जबरदस्त हसू कोसळतं. त्या दोघी परत सुरंगाजवळ येतात.)

**वनमालाः** तुमचं नाव सुरंगा माने ना?

**सुरंगाः** हो.

**वनमालाः** आणि नवऱ्याचं नाव एकनाथ मोने?

**सुरंगाः** हो.

**वनमालाः** सुमाताई (भारतीय पद्धतीने म्हणत) आणि सुमाताई (फ्रेंच पद्धतीने म्हणत), तुम्ही दोघी इथे पुळणीवर पाय लांब करून बसून राहा. कुठं हलू नका. खेकडाबिकडा दिसला तर त्याला हुंगू नका की हाताळू नका. तोवर मी ह्या एकनाथ मोन्यांना शोधून आणते. कधी भेटले नसले तरी बघितलेलं आहे. टीचभर तर गाव आहे. जातील कुठे?! (डोक्यावरची हॅट सारखी करून 'शोधू मी, कुठे, कशी, प्रिया तुला —' असं गाणं गुणगुणत तडक चालू लागते. मधोमध सुरक्षित अंतर राखून दोन्ही सुमा वाळूत बसकण मारतात.)



## प्रवेश पाचवा

(बंगल्याचा वऱ्हांडा. वेताच्या खुर्चीत बसून एमील 'कळ्यांचे निश्वास' वाचतो आहे. हातात एक कापडी पिशवी घेऊन आणि नाकाला पदर लावून वनमाला येते.)

**एमील:** वनमाले, बायको सापडली का?

**वनमाला:** सापडली ना. मागून येतेच आहे.

**एमील:** आणि नाकाला पदर का लावला आहेस?

**एमील:** तुम्हाला असता तर तुम्हीसुद्धा लावला असता. कळेल आता.

(नाकासमोर हात हलवणारी त्रासिक चेहऱ्याची सुरंगा, आणि तिच्यापासून (आणि एकमेकांपासून) बरंच अंतर राखून पाय ओढत एकनाथ आणि सुझन येतात.)

**एमील:** (थक्क होऊन) बाप रे! ही इतकी माणसं कोण?! आणि असा विचित्र सरमिसळ वास का येतो आहे?! ('कळ्यांचे निश्वास' वापरून स्वतःला वारा घालण्याचा प्रयत्न करतो.)

**वनमाला:** ओळख करून देते. नाकासमोर हात हलवते आहे ती तुमची मेव्हणी सुरंगा माने. (सुरंगा एमीलला तोंडदेखला नमस्कार करते.) मघाशी बंगल्यावर आली होती ती हीच. आपण दोघांनी आग्रह करून तिला दोन ग्लास वाईन पाजली.

**सुरंगा:** (एमीलला उद्देशून) पाहुणचार केल्याबद्दल तुमचे आभार मानते.

**एमील:** अहो, पण —

**वनमाला:** अंगाला कस्तुरीचा वास मारणारी ती सुरंगाची जुळी बहीण, म्हणजेच तुमची बायको सुझन माने.

**एमील:** सुझन! अगं, तू कुठे हरवली होतीस?!

**सुझन:** (एमीलला उद्देशून) ए—, आपण नंतर सविस्तर बोलू.

**वनमाला:** आणि अंगाला केवड्याचा वास येतो आहे तो तुमचा जुळा भाऊ एकनाथ मोने.

(एकनाथ आणि एमील एकमेकांसमोर येऊन अनिश्चितपणे पाहतात. वातावरणातली अवघड शांतता मोडण्यासाठी सुझन पुढे सरसावते.)

**सुझन:** तुम्हा सर्वांना माझ्या नवऱ्याची ओळख करून देते. हा ए-मील मोने. (अतिशयोक्त 'ए' म्हणते.)

**एकनाथ:** एमील?

**सुझन:** ए—मील. (कोपऱ्यात दुमडलेला आहे आणि तळवा उघडा आहे अशा पवित्र्यात डावा हात ताठ उचलून शरीराच्या उजव्या बाजूला तिरका करून दाखवते.)

**सुरंगा:** नाव एमील ना?

**सुझन:** ए—मील! (हाताने तीच कृती पुन्हा करून दाखवते.)

**एकनाथ:** (तिचा तिरका हात मनगटाशी पकडून त्याकडे रोखून बघत) तुम्ही 'ए' हे अक्षर सावरकरी पद्धतीने लिहिता का? मी लिहितो तेव्हा त्यावर मात्रा नसते.

**सुझन:** च्च. तुम्ही चुकीच्या बाजूने बघताहात. (सामोऱ्या असलेल्या एकनाथच्या कमरेला हात घालून त्याला आपल्या शेजारी वळवते.) ही मात्रा नव्हे. फ्रेंचमधला ॲक्यूट ॲक्सेंट आहे. (काय चक्रम बाई आहे अशा आविर्भावात वनमाला डोकं हलवते.)

**एमील:** सुझन, जाऊ दे ना. मला माझ्या भावाला भेटून घेऊ दे.

(ओठांना मुरड घालत सुझन बाजूला होते. एकनाथ आणि एमील एकमेकांना मिठी मारण्याचा अर्धवट आविर्भाव करतात पण तेवढा धीर न झाल्यामुळे हस्तांदोलनावर भागवतात.)

**वनमाला:** बायको आणि मेव्हणी मला पुळणीवर भेटल्या. तिथून पुढे जाऊन बाजारात भावाला शोधून काढला. तुमच्या मेव्हणीचं नाक तिखट आहे, त्यामुळे तिला कसलेकसले संशय पटकन येतात. ते थोपवून धरावेत म्हणून मामू अत्तरवाल्याकडून मिरगाची एक आणि केवड्याची एक अशा दोन बाटल्या विकत घेतल्या. तुमच्या भावाला एक दिली आणि बायकोला एक दिली. गडबडीत उलटापालट झाली हे मी कबूल करते, पण दोघांनीही घाबरून जास्त वापरलं ही आगळीक त्यांची आहे. बाजारात पुढे खाऱ्या पाण्याचा वास आला म्हणून गेले तर ताजे झिंगे मिळाले! (पिशवी

दाखवते.) आता तुम्हीच सांगा: अशी तीन माणसं एकदम घरात शिरल्यावर सरमिसळ दरवळ का येणार नाही?

**एमील:** दरवळ राहू देत; पण हे एवढे जुळे एकदम कुठून आले?! मला तर जुळा भाऊ आहे हे माहीतदेखील नव्हतं! (पाव्हण्यांना उद्देशून) अहो, बसा बसा —

(पण ते कठड्याला टेकून अवघडून एकमेकांकडे पाहात उभेच राहतात, तसा एमीलही गोंधळून उभा राहतो. सुझन दबक्या पावलांनी वनमालेजवळ येते.)

**सुझन:** मला थोडंसं मळमळतंय —

**वनमाला:** अहो, त्याचं एवढं काही नाही. (फडताळातून सुपारी घेऊन येते.) रत्नाग्रीची सुपारी आहे. लगेच बरं वाटेल. (सुरंगा आणि सुझनला देते.)

**सुरंगा:** (चिडून) अहो, मला कशाला देताय?! मला कुठे मळमळतंय?!

**वनमाला:** सॉरी हं. दोघी सारख्याच दिसता म्हणून चुकले —

**सुझन:** हे अगदी म्हणायलाच हवं होतं का?

**वनमाला:** एकमेकींना नसाल दिसत. बाकीच्यांना दिसल्याखेरीज राहाल कशा?! (सुपारी फडताळात परत ठेवत) पण आता मी काय म्हणते: सुमाताई (फ्रेंच पद्धतीने अतिशयोक्त उच्चारात) आणि एकनाथदादा, तुम्ही दोघे ताबडतोब आंघोळी करून घ्या. वर दोन न्हाणीघरं

आहेत, मी पाणी काढून देते. (नाकाला पदर लावत) आम्हाला इथे वावरणं अशक्य झालं आहे.

(दोघांना वर घेऊन जाते. रंगमंचावर आता फक्त एमील आणि सुरंगा आहेत. एमील 'कळ्यांचे निश्वास' उचलून वाचण्याचा बहाणा करू लागतो. संभाषण सुरू करावं की नको ह्याबद्दल सुरंगाच्या मनात चलबिचल आहे.)

**सुरंगा:** (धीर करून) कुठली कथा वाचताय?

**एमील:** सगळ्या सारख्याच आहेत.

(सुरंगा निश्वास सोडते. अवघड शांतता तशीच राहते. रंगमंचाच्या पुढच्या भागात सूत्रधारिणी आणि नट दबकत प्रवेश करतात.)

**सूत्रधारिणी:** गुंता झाला खरा.

**नट:** चांगलाच.

**सूत्रधारिणी:** आता काय करायचं?

**नट:** मलाही नीट सुचत नाहीय.

**सूत्रधारिणी:** खूप पूर्वीच्या काळची एक पद्धत मी ऐकलेली आहे. नाटक चालू असताना कथानकात अडसर आला तर त्यावर 'आपो मेखानेस थेओस' नावाचा उतारा होता. एका लाकडाच्या डोलीत

देवाला बसवून रंगमंचावर खाली उतरवत असत. मग तो देववाणी उच्चारून प्रश्न सोडवत असे. आपण कोंकणात आहोत. इथे मासळीच्या टोपल्या सहज मिळतील. त्यांत बसून स्टेजवर जाऊ.

**नट:** तो प्रकार ट्रॅजेडीला वापरायचे. कॉमेडीला नाही.

**सूत्रधारिणी:** हिला आता कॉमेडी कोण म्हणेल?!

**नट:** पण नको. आपलं हसं होईल. मानसशास्त्रज्ञ कधी मासळीच्या टोपलीत बसतात का?

**सूत्रधारिणी:** तेही खरंच आहे.

**नट:** पण आत जायचं हे तर आपण ठरवलंच होतं.

(एवढ्यात वनमाला वरून खाली येते.)

**सूत्रधारिणी:** मी हिला विचारून बघते.

(नट आणि सूत्रधारिणी ह्या दोघांच्या दृष्टीने बाकीची पात्रं एका अदृश्य काचेमागे आहेत. ह्या काचेवर सूत्रधारिणी बोटांनी टकटक करते, तशी वनमाला जवळ येते.)

**वनमाला:** कोण पाहिजे?

**सूत्रधारिणी:** नमस्कार! मी ह्या नाटकाची सूत्रधारिणी आहे. हा माझा सहकारी नट. (तोही ओशाळं

हसून नमस्कार करतो.) आम्हाला आत येऊ द्या.

**वनमाला:** (कपाळाला आठ्या घालून) नाट्यशास्त्रात तशी परवानगी नाही —

**सूत्रधारिणी:** काय?!

**वनमाला:** तशी परवानगी नाही.

**सूत्रधारिणी:** अहो, पण अधिकृत सूत्रं माझ्या हाती आहेत.

**वनमाला:** तुम्हाला चौथं तावदान फोडून आत यायचं आहे का? नाट्यशास्त्रात तशी परवानगी नाही.

**सूत्रधारिणी:** पण —

**वनमाला:** चौथं तावदान कसं फोडायचं याचे नियम काटेकोर असतात. ते फोडून आतून बाहेर आलेलं चालतं, पण बाहेरून आत आलेलं चालत नाही.

(सूत्रधारिणी नटाला ढोसते. तो धीर एकवटतो.)

**नट:** अहो, पण हा खेळ आमचा आहे. आम्ही (आवंढा गिळून) मानसशास्त्रज्ञ आहोत.

**वनमाला:** मानसशास्त्रज्ञ?!

**नट:** हो! मुखांधळेपणा ह्या विकाराबद्दल जनजागृती करायची म्हणून हे नाटक करतो आहोत. आत्तापर्यंत सगळं छान सांभाळलंय तुम्ही! आम्ही पाहतो आहोत ना इथून —

**वनमाला:** बरं बरं! उगीच लाडीगोडी लावू नका. हे बघा, तुम्ही मागच्या दारी या. तुम्हाला स्वयंपाकघरातून आत घेते. (सूत्रधारिणी आणि नट विंगेत अदृश्य होतात.) एवढं शिकूनही काही रीतभात नाही. (गुणगुणते.) मानस का बधिरावे —

(सावकाश हालचाली करत आत जाऊन दोघांना घेऊन येते. सूत्रधारिणी आणि नट वेताच्या खुर्च्यांवर बसतात. त्यांच्यापैकी कुणीतरी बोलायला सुरुवात करणार एवढ्यात एकनाथ आणि सुज्ञन श्रीमंती ढंगाचे आवळेजावळे बाथरोब घालून ओल्या केसांनी खाली येतात. त्याच्या रोबवर 'त्याचा/sa' आणि तिच्या रोबवर 'तिचा/sa' अशी वेलबुट्टीदार अक्षरं लिहिलेली आहेत. सगळेजण त्यांच्याकडे टकमका पाहताहेत. अवघडलेपणात आणखीनच भर पडते.)

**सूत्रधारिणी:** (सगळ्यांकडे बघून) नमस्कार! मी ह्या नाटकाची सूत्रधारिणी आणि हा नट. माझ्या हाताखाली शिकायला आहे.

**वनमाला:** का येणं केलंत?

**नट:** एवीतेवी नाटक ह्या टप्प्यावर आलं की आत शिरण्याचा आमचा विचार पहिल्यापासूनच होता. तुम्हा सर्वांना कथानक समजावून सांगायचं होतं. जुळ्यांच्या जन्माची कूळकथा काय आहे —

**वनमाला:** अहो, त्यात समजावून सांगण्यासारखं काय आहे?! जग बघितलेलं असलं की अदमासाने कळतं ना! मी काय म्हणते की ह्या दोन जुळ्या पोरी तान्ह्या असताना अनाथालयात पडल्या

असणार. अनाथालयं म्हणजे त्यांचे पैशाचे नेहमीचे वांधे असतात. इतकी पोरं एकाच वेळी सांभाळणं त्यांना झेपत नाही. तेव्हा अशाच केव्हातरी दोघी दोन ठिकाणी पांगल्या. माने मंडळींना पोर होत नव्हतं म्हणून त्यांनी एकीला गुपचूप दत्तक घेतली आणि स्वत:ची म्हणून सांगितली. हे असं सर्रास चालतं. त्याची एक रुळलेली पद्धत आहे. खोटं बाळंत व्हायच्या दोन महिने आधी पोटाला बोचकं बांधून शालू नेसून देवदर्शनाला जाऊन आलं की लोक फसतात. आयत्या वेळी सुईणीला नुसती बोलावून बसवून ठेवायची आणि चारसहा तासांनी जेवायला घालून साडीचोळी देऊन कपाळावर घाम आल्यासारखं दाखवून बाहेर काढायची. दोघा पोरग्यांचंही हेच असंच झालं असणार —

**नट:** हो, ते अगदी बरोबर आहे. हेच समजावून सांगणार होतो आम्ही —

**वनमाला:** समजावून सांगण्यासारखं ह्यात काही नाही. सरळसोट गोष्ट आहे.

**सुरंगा:** पण मला एक कळत नाही! असं असेल तर माझ्या माहेरच्यांनी आणि सासरच्यांनी लग्नाला एवढा निकराचा विरोध का म्हणून केला?

**एकनाथ:** अगं, ते सोपं आहे. केला नसता तर लोकांना संशय नसता का आला? लोक म्हणाले असते शहाण्णव कुळी पोरगी बामणाला देताय. पूर्वजांच्या रक्ताची तुम्हाला काही चाड आहे की नाही? तेव्हा मग आव आणावा लागला. माझ्या आईबाबांकडून हेच कारण असणार. इकडचा आर्यधर्म आणि तिकडचा क्षात्रधर्म दोन्हीही तितकेच बनावट होते. पण त्याचमुळे उभयपक्षांना ते आवर्जून मिरवावे लागले.

**सुरंगा:** हं! सगळ्यांना समोर उभं करून कशी फैलावर घेते बघाच तुम्ही आता!

**एकनाथ:** अगं जाऊ दे ना. आपल्यासमोर तोच एक प्रश्न आहे का?

(विचित्र शांतता नांदते. एमील हवामान बदलण्याचा प्रयत्न करतो.)

**एमील:** पण आमचं सगळं वेगळंच झालं बरं का! सुझन म्हणालीच असेल तुम्हाला. आम्ही दोघेही आपापल्या आईबापांबरोबर फ्रान्सला गेलो तेव्हा मायदेशाशी संपर्क तुटला तो तुटलाच! नाही का सुझन?!

**सुरंगा:** (चिडून) पण म्हणून मायदेशात येऊन बहिणीचा असा केसाने गळा कापायचा?!

**सुझन:** बहिणाबाई, माझ्यावर का डाफरताय? त्याआधी तुमच्या नवऱ्यालाच चार रोखठोक प्रश्न विचारा ना!

**सुरंगा:** विचारणारच आहे! सोडते की काय?!

**एमील:** सुमा (फ्रेंच पद्धतीने म्हणत), हा काय प्रकार आहे? कुणी कुणाचा गळा कापला?

**सुरंगा:** मला 'सुमा' म्हणू नका. एवढी सलगी कशाला करताय?

**एमील:** तुम्हाला नव्हे हो, माझ्या बायकोला म्हणतो आहे. तुम्ही असं करा, मी हाक मारत असताना माझ्या चेहऱ्याकडे नीट लक्ष देऊन बघत चला. ओठांचा चंबू केलेला असेल तर हाक माझ्या बायकोला उद्देशून आहे, तुम्हाला नाही.

**सुरंगा:** पण मुळात चेहरा नीट दिसायला हवा ना.

**एमील:** म्हणजे? तुम्हीही मुखांधळ्या आहात की काय?

**सुरंगा:** हो ना. शब्द माहीत नव्हता तेवढा मात्र आज कळला. आता माझी आणि जुळ्या बहिणीची गुणसूत्रं तीच असणार ना. नको तिथे गुण उधळायचीच!

**एमील:** हे बघा, उगीच त्रागा कशाला करताय? मी इथे बंगल्यात 'कळ्यांचे निश्वास' वाचत निमूट बसलो होतो. काय झालं मला काहीही धड कळलेलं नाही—

**सुझन:** ए—, आपण दोघेच असताना बोलू म्हटलं ना? मी सगळं सांगेन तुला. पश्चिमी आधुनिक संस्कृतीत वाढलेला शहाणासुरता नवरा आहेस ना तू?

**एमील:** हो, आहे. पण — (थांबून) एकनाथ, तू सांग. काय झालंय?

**एकनाथ:** तू आणि वहिनी आधी बोलून घ्या.  मग बघू आपण —

**सूत्रधारिणी:** मी काय म्हणते की एखादी कृती उचित की अनुचित हे ठरवण्याचे दोन निकष असतात. एकतर तिच्या परिणामावरून किंवा करणाऱ्याच्या मानसशास्त्रीय भूमिकेवरून. आता दुसरा निकष लावून जर विचार केला —

**सुरंगा:** तुम्ही गप्प बसा हो. निष्कारण घोळ घालून ठेवलाय. जनजागृती करताहेत —

**वनमाला:** (सूत्रधारिणी आणि नटाला उद्देशून) तुम्ही दोघे आता काही बोलू नका. मी निस्तरेन काय ते. (इतरांना उद्देशून) आपण असं करू. हे एवढे ताजे झिंगे आणले आहेत त्यांची मी तव्यावर चरचरीत तिखट भाजी करते. लोण्यातला पापलेट मघाशीच केलेला आहे. घडीच्या पोळ्या करते आणि भात टाकते. सगळीजणं पोटभर जेवा. भाऊभाऊ बहीणबहीण पहिल्यांदाच भेटताय. (सूत्रधारिणी आणि नटाकडे जाते.) मी काय म्हणत होते की जेवण पाचच माणसांना पुरेल एवढं आहे. भाऊभाऊ, बहिणीबहिणी, जावाजावा, साडूसाडू अशा सगळयांच्या आनंदाचा दिवस आहे तर त्यांना कमी नको पडायला. तेव्हा थोडं समजुतीनं घ्या, आणि —

(सूत्रधारिणी आणि नट एकमेकांकडे बघतात आणि खुर्च्यांतून उठतात.)

**वनमाला:** (हात जोडत) भेटून आनंद वाटला. पुन्हा याल तेव्हा जेवायलाच या!

(ते दोघेजण वनमालेजवळ काहीतरी कुजबुजतात.)

**वनमाला:** चालेल. तेवढं एक उरकून घेऊ, म्हणजे तुम्हा दोघांचा खोळंबा व्हायचा नाही.

(सूत्रधारिणी आणि नट पात्रांना एकत्र जमवतात. स्टेजच्या पुढल्या भागात क्रमाने सूत्रधारिणी, एमील, सुरंगा, सुझन, एकनाथ आणि नट चंद्रकोरीच्या आकारात उभे राहतात. सुझनला अजूनही मळमळतंच आहे. वनमाला मागून येऊन सुरंगा आणि सुझन यांची अदलाबदल करते आणि दोघींच्या मध्ये उभी राहते. सर्वजण प्रेक्षकांना अभिवादन करतात. सूत्रधारिणी आणि नट दबक्या पावलांनी नजरेआड जातात.)

**वनमाला:** (चौघांकडे भिरभिर नजरेने हसून पाहात) गेले एकदाचे. आता आपल्याला मोकळीक राहील. (प्रेक्षकांना उद्देशून) मंडळी, पोटात कावळे ओरडताहेत, तेव्हा आम्ही आपली रजा घेतो. लोभ असू द्यावा ही विनंती!

(वनमाला ठुमक्या पावलांनी आत जाते. दोघे मोने आणि दोघी माने असे चौघेजण एकमेकांची नजर टाळत तिच्यामागून रेंगाळत्या पावलांनी जातात. जाण्यापूर्वी सुझन माठातलं पेलाभर पाणी पिऊन घेते. सूत्रधारिणी आणि नट पुन्हा एकदा रंगमंचावर येतात.)

**सूत्रधारिणी:** तिला जुळे होणार आहेत हे काही आपण बोललो नाही.

**नट:** माझा धीर झाला नाही.

**सूत्रधारिणी:** माझाही नाही. पण मी म्हणते झालं ते झालं. जुळ्यांची नावं-आडनावं काय ठेवायची हा आता त्या चौघांचा प्रश्न आहे. यापुढे जुलमाची जवळीकच करा मेल्यांनो. तुमची सगळी मोकळीक संपून गेलेली आहे.

✲ ✲